॥ ॐ श्रीपरमात्मने नमः॥

# अथ त्रयोदशोऽध्यायः

## अवतरणिका

*बाराव्या अध्यायाच्या आरंभी अर्जुनाने विचारले की, आपली (सगुण-साकार) उपासना करणारे आणि अव्यक्त अक्षराची (निर्गुण-निराकार) उपासना करणारे— या दोन्हींपैकी कोण श्रेष्ठ आहे ? उत्तरात भगवंतांनी आपली उपासना करणाऱ्यांना श्रेष्ठ म्हटले आणि पुढे म्हटले की, अव्यक्त अक्षराची उपासना करणारेही मलाच प्राप्त होतात. परंतु देहाभिमान राहत असल्यामुळे त्यांना उपासनेत अधिक कठिणता जाणवते. असे म्हणून भगवंतांनी सगुण-साकाराच्या उपासनेचे विस्ताराने वर्णन केले. आता अव्यक्त अक्षराच्या उपासनेचे विस्ताराने वर्णन करण्यासाठी आणि त्यातील देहाभिमानरूपी मुख्य बाधा समाप्त करण्यासाठी भगवान् तेराव्या अध्यायाचा विषय आरंभ करतात.*

*श्रीभगवानुवाच*

**इदं शरीरं कौन्तेय क्षेत्रमित्यभिधीयते।**
**एतद्यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञ इति तद्विदः॥ १ ॥**

श्रीभगवान् म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कौन्तेय** | = हे कुन्तीपुत्र अर्जुन! | **इति** | = या | **वेत्ति** | = जाणतो, |
| **इदम्** | = 'हे' रूपाने म्हटले जाणाऱ्या | **अभिधीयते** | = नावाने म्हणतात (आणि) | **तम्** | = त्याला |
| | | | | **तद्विदः** | = ज्ञानीलोक |
| | | | | **क्षेत्रज्ञः** | = 'क्षेत्रज्ञ'— |
| **शरीरम्** | = शरीराला | **एतत्** | = या क्षेत्राला | **इति** | = या नावाने |
| **क्षेत्रम्** | = 'क्षेत्र'— | **यः** | = जो | **प्राहुः** | = म्हणतात. |

*व्याख्या*— **इदं शरीरं कौन्तेय क्षेत्रमित्यभिधीयते**— हा पशू आहे, हा पक्षी आहे, हा वृक्ष आहे इत्यादी भौतिक वस्तूंना मनुष्य ''इदंतेने'' अर्थात् ''हे'' रूपाने संबोधतो आणि या शरीराला कधी ''मी'' रूपाने कधी ''माझे'' रूपाने संबोधतो. परंतु वास्तविक आपले म्हणविले जाणारे शरीरही, इदंतेनेच म्हटले जाणारे आहे. मग ते स्थूलशरीर असो, सूक्ष्मशरीर असो अथवा कारणशरीर असो, परंतु ते सर्व इदंतेनेच म्हणविले जाणारे आहेत.

जे पृथ्वी, आप, तेज, वायू आणि आकाश—या पाच तत्त्वांनी बनलेले आहे अर्थात् जे माता-पित्याच्या रज-वीर्या-पासून उत्पन्न होत असते, त्याला स्थूलशरीर म्हणतात. याचे दुसरे नाव ''अन्नमय कोश'' आहे कारण हे अन्नाच्या विकारा-पासून उत्पन्न होत असते आणि अन्नानेच जिवंत राहते. म्हणून हे अन्नमय, अन्नस्वरूपच आहे. इंद्रियांचा विषय असल्याने हे शरीर ''**इदम्**'' (''हे'') म्हटले जाते.

पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये, पंचप्राण, मन आणि बुद्धी—या सतरा तत्त्वांनी बनलेल्या शरीरास सूक्ष्मशरीर म्हणतात. या सतरा तत्त्वांपैकी प्राणांच्या प्रधानतेने हे सूक्ष्म शरीर ''प्राणमयकोश'', मनाच्या प्रधानतेने हे ''मनोमय कोश'' आणि बुद्धीच्या प्रधानतेने हे ''विज्ञानमयकोश'' म्हणविले जाते. असे हे सूक्ष्मशरीरही अंतःकरणाचा विषय असल्याने ''**इदम्**'' म्हटले जाते.

अज्ञानाला कारणशरीर म्हणतात. मनुष्याला बुद्धी-पर्यंतचे तर ज्ञान होते, परंतु बुद्धीच्या पुढील ज्ञान होत नाही, म्हणून त्याला अज्ञान म्हणतात. हे अज्ञान संपूर्ण शरीरांचे कारण असल्याने ''कारणशरीर'' म्हणविले जाते— ''**अज्ञानमेवास्य हि मूलकारणम्**'' (अध्यात्म० उत्तर० ५। ९) या कारणशरीराला स्वभाव, सवय आणि प्रकृतीही म्हटले जाते तसेच याला ''आनंदमयकोश'' ही म्हणतात. जागृतावस्थेत स्थूलशरीराची प्रधानता असते आणि त्यात

सूक्ष्म आणि कारणशरीरही बरोबर असते. स्वप्नावस्थेत सूक्ष्म-शरीराची प्रधानता असते आणि त्यात कारणशरीरही बरोबर असते. सुषुप्ती अवस्थेत स्थूलशरीराचे (अन्नमयकोशाचे) ज्ञान राहत नाही आणि सूक्ष्मशरीराचेही ज्ञान रहात नाही. हे सूक्ष्मशरीर प्राणमय, मनोमय आणि विज्ञानमयकोशाचे असते अर्थात् बुद्धी अविद्येत (अज्ञानात) लीन होते. म्हणून सुषुप्ती अवस्था कारणशरीराची असते. जागृत आणि स्वप्नावस्थेत तर सुख-दुःखाचा अनुभव येत असतो, परंतु सुषुप्ती अवस्थेत दुःखाचा अनुभव येत नाही पण सुख मात्र राहते. म्हणून कारणशरीराला ''आनंदमयकोश'' म्हणतात. कारणशरीरसुद्धा स्वचा विषय असल्याने, स्व कडून जाणण्यात येत असल्याने ''**इदम्**'' म्हटले जाते.

उपरोक्त तिन्ही शरीरांना ''शरीर'' म्हणण्याचे तात्पर्य, याचा प्रतिक्षण नाश होत असतो.* यांना कोश म्हणण्याचे तात्पर्य, जसे तलवार ठेवण्यासाठी चामड्याची म्यान असते आणि त्या म्यानेने ती तलवार झाकली जाते, तसेच हा जीवात्मा या तिन्ही शरीराला आपले मानतो आणि त्यामध्ये वास करतो. अशा तऱ्हेने तो तिन्ही शरीरांनी झाकला जातो म्हणून या तिन्ही शरीरांना ''कोश'' संज्ञा दिली जाते.

या शरीराला ''क्षेत्र'' म्हणण्याचे तात्पर्य हे, प्रत्येक क्षणाला बदलत राहते आणि नष्ट होत राहते.† हे इतके जलद बदलत असते की, याला दुसऱ्या क्षणी जसाच्या तसा कोणी पाहू शकत नाही, कारण ते बदललेले असते.

शरीराला क्षेत्र, शेत या अर्थानेही म्हटले जाते. जसे शेतात निरनिराळी बीजे पेरून पिके घेतली जातात, तसेच या मनुष्यशरीरात अहंता-ममता करून जीव अनेक प्रकारचे कर्म करत असतो. त्या कर्मांचे संस्कार अंतःकरणावर पडलेले असतात. ते संस्कार जेव्हा फलाच्या रूपात प्रकट होतात, तेव्हा दुसरे (देवता, पशु-पक्षी, कीट-पतंग इत्यादी) शरीर मिळत असते. शेतात आपण जसे बीज पेरू, तसेच धान्य उत्पन्न होते. त्याचप्रमाणे या शरीराने जशी कर्म केली जातात, त्यानुसारच दुसरे शरीर, परिस्थिती इत्यादी प्राप्त होतात. तात्पर्य, या शरीरात केल्या गेलेल्या कर्मानुसारच हा जीव वारंवार जन्म-मरणरूपी फल भोगत असतो. या दृष्टीने याला क्षेत्र (शेत) म्हटले गेले आहे.

आपल्या वास्तविक स्वरूपाहून वेगळे दिसणारे हे, शरीर, पदार्थ, क्रिया, वर्ण-आश्रम इत्यादी प्राकृतिक असल्या-कारणाने ''**इदम्**'' (दृश्य) च आहे. हे खरे तर ''**इदम्**'' च आहे; परंतु जीवाने भ्रमाने याला ''**अहम्**'' मानले आहे आणि फसला आहे. स्व परमात्म्याचा अंश तसेच चेतन आहे, सर्वांत महान् आहे. परंतु जेव्हा तो जड (दृश्य) पदार्थाला महत्त्व देतो (जसे ''मी धनवान् आहे'', ''मी विद्वान् आहे'' इत्यादी) तेव्हा तो स्वतःचे वास्तविक असलेले महत्त्व कमी लेखतो. एवढेच नव्हे, तर आपली स्वतःची फार मोठी बेइज्जती करून घेतो. कारण धन, विद्या इत्यादीमुळे तो आपल्याला मोठे समजतो तर धन, विद्या हेच मोठे झाले, त्याचे स्वतःचे महत्त्व तर काहीच राहिले नाही. वास्तविक पाहिले असता, महत्त्व स्वचेच आहे, नाशवान् आणि जड पदार्थाचे नव्हे. कारण जेव्हा स्व त्या पदार्थांचा स्वीकार करत असतो, तेव्हाच तर ते महत्त्वशाली ठरतात. म्हणूनच भगवान् ''**इदं शरीरं क्षेत्रम्**'' पदाने शरीरादी पदार्थांना आपल्याहून वेगळे ''इदंतेने'' पाहण्यासाठी म्हणत आहेत.

**एतद्यो वेत्ति**—जीवात्मा या शरीराला जाणतो अर्थात् हे शरीर माझे आहे, इंद्रिये माझी आहेत, मन माझे आहे, बुद्धी माझी आहे, प्राण माझे आहेत—असे मानत असतो. हा जीवात्मा या शरीराला कधी ''मी'' म्हणत असतो आणि कधी याला ''हे'' म्हणतो, अर्थात् कधी ''मी शरीर आहे'' असेही मानतो आणि कधी ''हे शरीर माझे आहे'' असेही मानतो.

या श्लोकाच्या पूर्वार्धात शरीराला ''**इदम्**'' पदाने म्हटले आहे आणि उत्तरार्धात शरीराला ''**एतत्**'' पदाने म्हटले आहे. जरी ही दोन्हीही पदे जवळची वाचक आहेत. तरीपण ''**इदम्**'' पेक्षा ''**एतत्**'' पद अत्यंत जवळचे वाचक आहे. म्हणून येथे ''**इदम्**'' पद अंगुलीनिर्दिष्ट शरीर समुदायाचे द्योतन करते आणि ''**एतत्**'' पद या शरीराविषयी जो ''मी'' पणा आहे, त्या ''मी'' पणाचे द्योतन करते.

**तं प्राहुः क्षेत्रज्ञ‡ इति तद्विदः**—जसे दुसऱ्या अध्यायाच्या सोळाव्या श्लोकात सत्-असत्च्या तत्त्वास जाणणाऱ्याला तत्त्वदर्शी म्हटले आहे, तसेच येथे क्षेत्र-क्षेत्रज्ञाच्या तत्त्वास जाणणाऱ्याला ''**तद्विदः**'' म्हटले आहे. क्षेत्र काय आहे आणि क्षेत्रज्ञ काय आहे, याचा ज्याला बोध झालेला आहे, असे तत्त्वज्ञ महापुरुष या जीवात्म्याला

* ''शॄ हिंसायाम्'' धातुपासून ''शरीर'' शब्द तयार होतो.

† ''क्षि क्षये'' धातुपासून ''क्षेत्र'' शब्द तयार होतो.

‡ जरी ''प्राहुः'' क्रियेचे कर्म असल्यामुळे ''क्षेत्रज्ञ'' शब्द द्वीतीया विभक्तीत असावयास पाहिजे होता, तरीपण पुढे ''इति'' पद आल्याने अर्थात् ''इति'' पदाने उक्त असल्याने ''क्षेत्रज्ञ'' शब्दामध्ये प्रथमा विभक्ती झाली आहे.

''क्षेत्रज्ञ'' नावाने संबोधतात. जर ह्या जीवात्म्याने क्षेत्राशी संबंध ठेवला नाही तर मग ह्याची ''क्षेत्रज्ञ'' संज्ञा राहणार नाही, हा परमात्मस्वरूप होऊन जाईल. (१३।३१)

## मार्मिक गोष्ट

ज्या ठिकाणी बंधन होत असते त्या ठिकाणीच सोडल्याने बंधन सुटत असते, असा नियम आहे. म्हणून मनुष्यशरीरानेच बंधन होत असते आणि मनुष्यशरीराद्वाराच बंधनापासून मुक्ती मिळू शकते. जर मनुष्याचा आपल्या स्वतः-च्या शरीराशी अहंता-ममतारूपी कोणत्याही प्रकारचा संबंध राहिला नाही, तर तो संपूर्ण संसारापासून मुक्तच असतो. म्हणून भगवान् शरीराशी मानलेल्या अहंता-ममतारूपी संबंधाचा विच्छेद करण्यासाठी शरीराला ''क्षेत्र'' सांगून त्याला इदंतेने (वेगळे) पाहण्यास सांगत आहेत, जे वास्तविक वेगळे आहेच.

शरीराला इदंतेने पाहणे, केवळ स्वतःचे कल्याणेच्छु साधकांसाठीच नव्हे, तर मनुष्यमात्रासाठी परम आवश्यक आहे. कारण स्वतःचा उद्धार करण्याचा अधिकार आणि अवसर मनुष्यशरीरातच आहे. ह्याच कारणाने गीतेचा उपदेश आरंभ करतानाच भगवंतांनी सर्वात प्रथम शरीर आणि शरीरीच्या वेगळेपणाचे वर्णन केले आहे.

''**इदम्**'' चा अर्थ ''हे'' आहे अर्थात् आपल्याहून वेगळे दिसणारे. पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश यापासून तयार झालेले हे स्थूलशरीर सर्वात प्रथम दिसून येते. हे दृश्य असून परिवर्तनशील आहे. याला पाहणारे डोळे आहेत. जसे दृश्यात रंग, आकृती, अवस्था, उपयोग, इत्यादी सर्व बदलत राहतात, परंतु त्यांना पाहणारे डोळे तेच राहतात, तसेच शब्द, स्पर्श, रूप, रस, गंधरूपी विषयही बदलत राहतात, परंतु त्यांना जाणणारे कान, त्वचा, नेत्र, जिव्हा आणि नासिका तेच राहतात. जसे डोळ्याने उत्तम दिसणे, कमी दिसणे आणि मुळीच न दिसणे, हे डोळ्यात होणारे परिवर्तन मनाकडून जाणले जाते. तसेच कान, त्वचा, जिव्हा आणि नाकात होणारे परिवर्तनही मनाकडून जाणले जाते. म्हणून पाचही ज्ञानेंद्रिय (कान, त्वचा, नेत्र, जिव्हा आणि नासिका) देखील दृश्य आहेत. कधी क्षुब्ध आणि कधी शांत, कधी स्थिर कधी चंचल हे मनात होणारे परिवर्तन, बुद्धीकडून जाणले जाते. म्हणून मनही दृश्य आहे. कधी योग्य प्रकारे समजणे, कधी कमी समजणे, कधी मुळीच न समजणे; हे बुद्धीत होणारे परिवर्तन स्व (जीवात्मा) कडून जाणले जाते. म्हणून बुद्धीही दृश्य आहे. बुद्धी इत्यादीचा द्रष्टा स्वमध्ये (जीवात्मा) कधी परिवर्तन झाले नाही, होत नाही, होणार नाही आणि होणे शक्यही नाही. ते सदा एकरस राहत असते. म्हणून ते कधी कोणाचे दृश्य होऊ शकत नाही.*

इंद्रिये आपापल्या विषयाला तर जाणू शकतात, परंतु विषय आपल्या पलीकडील असलेल्या (सूक्ष्म, श्रेष्ठ आणि प्रकाशक) इंद्रियांना जाणू शकत नाहीत. त्याचप्रमाणे इंद्रिये आणि विषय मनाला जाणू शकत नाहीत. मन, इंद्रिये आणि विषय, बुद्धीला जाणू शकत नाहीत. तसेच बुद्धी, मन, इंद्रिये आणि विषय स्व ला जाणू शकत नाहीत. न जाणण्याचे मुख्य कारण हे आहे की, इंद्रिये, मन आणि बुद्धी तर सापेक्ष द्रष्टा आहेत; अर्थात् परस्पराच्या साहाय्याने आपल्यापेक्षा स्थूल रूपाला पाहणारे आहेत, परंतु स्व (जीवात्मा) शरीर, मन, इंद्रिये आणि बुद्धिपेक्षा अत्यंत सूक्ष्म आणि श्रेष्ठ असल्यामुळे निरपेक्ष द्रष्टा आहे अर्थात् इतरांच्या साहाय्याशिवाय स्वतःच पाहणारा आहे.

उपर्युक्त विवेचनात जरी इंद्रिये, मन आणि बुद्धीला-ही द्रष्टा म्हटले गेले आहे तरीही, तेथे हे समजून घ्यावे की, यांच्याबरोबर स्व (जीवात्मा) असला तरच यांच्याकडून पाहणे शक्य आहे (तेव्हाच हे द्रष्टा होऊ शकतात). कारण मन, बुद्धी इत्यादी जड प्रकृतीचे कार्य असल्याने स्वतंत्र द्रष्टा होऊ शकत नाहीत. म्हणून वास्तविक द्रष्टा स्व च आहे. दृश्य पदार्थ (शरीर), पाहण्याची शक्ती (नेत्र, मन, बुद्धी) आणि पाहणारा (जीवात्मा) या तिन्हीत गुणांची भिन्नता असूनही तात्त्विक एकता आहे कारण तात्त्विक ऐक्याशिवाय पाहण्याचे आकर्षण, पाहण्याचे सामर्थ्य, आणि पाहण्याची प्रवृत्ती सिद्धच होत नाही. येथे ही शंका येऊ शकते की, स्व (जीवात्मा) तर चेतन आहे, मग तो जड बुद्धी इत्यादीला (ज्याच्याशी त्याची तात्त्विक एकता नाही) कसा पाहतो ? याचे समाधान, स्व जडाशी तादात्म्य करून जडासह स्वतःला ''मी'' समजतो. हे ''मी'' जडही नाही आणि चेतनही नाही. जडाविषयी महत्त्व ठेवून हा

* रुपं दृश्यं लोचनं दृक् तद्दृश्यं दृक् तु मानसम्। दृश्या धीवृत्तय: साक्षी दृगेव न तु दृश्यते॥

(दृग्दृश्यविवेक २)

''सर्वप्रथम नेत्र द्रष्टा आहेत आणि रूप दृश्य आहे. नंतर मन द्रष्टा आहे आणि नेत्रादी इंद्रिये दृश्य आहेत. त्यानंतर बुद्धी द्रष्टा आहे आणि मन दृश्य आहे. शेवटी बुद्धीच्या वृत्तींचाही जो द्रष्टा आहे, तो साक्षी (स्वप्रकाश आत्मा) कोणाचेही दृश्य नाही.''

जडाशी तादात्म्य करून म्हणतो की, "मी धनवान् आहे", "मी विद्वान आहे", इत्यादी आणि चेतनाला महत्त्व देऊन हा चेतनाशी ऐक्य करून म्हणतो की, "मी आत्मा आहे", "मी ब्रह्म आहे" इत्यादी. हाच प्रकृतिस्थ पुरुष आहे, जो प्रकृतिजन्य गुणांच्या संगाने उच्च-नीच योनीत वारंवार जन्म घेत राहतो. (१३।२१) तात्पर्य प्रकृतिस्थ पुरुषामध्ये जड आणि चेतन दोन्ही अंश विद्यमान असतात. चेतनाची आवड परमात्म्याकडे जाण्याची असते, परंतु भ्रमाने त्याने जडाशी तादात्म्य केलेले असते. तादात्म्यामधील जो जड अंश आहे, त्याचे आकर्षण (प्रवृत्ती) जडतेकडे असल्याने, तोच सजातीयतेच्या कारणाने जड बुद्धी इत्यादीचा द्रष्टा होतो. पाहणे केवळ सजातीयतेमध्येच शक्य असते असा नियम आहे; अर्थात् दृश्य, दर्शन आणि द्रष्टा एकाच जातीचे असल्याने पाहण्याची क्रिया होते, अन्यथा होत नाही. या नियमावरून असे कळते की, स्व (जीवात्मा) जोपर्यंत बुद्धी इत्यादिंचा द्रष्टा असतो तोपर्यंत त्याच्यात बुद्धीच्या जातीची जड वस्तू आहे अर्थात् जड प्रकृतीशी त्याचा मानलेला संबंध आहे. हा मानलेला संबंधच सर्व अनर्थाचे मूळ आहे. याच मानलेल्या संबंधामुळेच तो संपूर्ण जड प्रकृती अर्थात् मन, बुद्धी, इंद्रिये, विषय, शरीर आणि पदार्थांचा द्रष्टा होतो.

**परिशिष्ट भाव—'इदम्'** (क्षेत्र) याच्या अंतर्गत अनंत ब्रह्माण्ड आहेत. अनंत ब्रह्मांण्डांत जितके काही शरीर आहेत, त्यांत 'परा' (जीव) क्षेत्रज्ञ आहे आणि 'अपरा' (जगत्) क्षेत्र आहे. जीव जगताला जाणणारा आणि परमात्म्याला मानणारा आहे. जाणणारा व्यापक असतो. म्हणून क्षेत्रज्ञाच्या एका अंशात अनंत ब्रह्माण्ड आहेत—**'येन सर्वमिदं ततम्'** (गीता २।१७). साधकाने हे समजून घ्यावे की, मी क्षेत्र नाही, तर क्षेत्राला जाणणारा क्षेत्रज्ञ आहे.

दृश्य द्रष्ट्याच्या एका अंशात असते. जसे, नेत्राने सर्व काही पाहून सुद्धा नेत्र भरत नाहीत. म्हणून नेत्र वास्तविक दृश्यापेक्षाही मोठे झाले. बुद्धीने कितीही गोष्टी जाणल्या, परंतु बुद्धी कधी भरत नाही, रिकामीच राहते. जसे भरतो तशी रिकामी होते. म्हणून बुद्धी मोठी झाली. ब्रह्मदेवाची उत्पत्ती, स्थिती आणि प्रलय हेही आपल्या बुद्धीच्या जाणण्याच्या अंतर्गत आहेत. स्थूल, सूक्ष्म आणि कारण संपूर्ण शरीर दृश्य आहे. तसेच स्थूल, सूक्ष्म आणि कारण संपूर्ण सृष्टीही दृश्य आहे. हे संपूर्ण दृश्य द्रष्ट्याच्या (क्षेत्रज्ञाच्या) कोण्या एका अंशात आहे.

जसे धनाच्या संबंधाने मनुष्य 'धनवान्' म्हटला जातो. परंतु धनाचा संबंध राहिला नाही तर धनवान् (व्यक्ती) तर राहतो, परंतु त्याची 'धनवान्' संज्ञा राहत नाही. तसेच क्षेत्राच्या संबंधाने स्वयं 'क्षेत्रज्ञ' म्हणविला जातो, परंतु क्षेत्राचा संबंध न राहिल्यास क्षेत्रज्ञ (स्वयं) तर राहतो, परंतु त्याची 'क्षेत्रज्ञ' संज्ञा राहत नाही. तात्पर्य हे आहे की, एकच चिन्मय तत्त्व (समजण्याच्या दृष्टीने) क्षेत्राच्या संबंधाने क्षेत्रज्ञ, क्षरच्या संबंधाने अक्षर, शरीराच्या संबंधाने शरीरी, दृश्याच्या संबंधाने द्रष्टा, साक्ष्यच्या संबंधाने साक्षी आणि करणाच्या संबंधाने कर्ता म्हटला जातो. वास्तविक त्या तत्त्वाला कोणते नावच नाही. केवळ अनुभवरूप आहे.

***संबंध***—*त्या क्षेत्राचे स्वरूप काय आहे हे पुढील श्लोकात सांगत आहेत.*

## क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत।
## क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम॥ २॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **भारत** | = हे भरतवंशोद्भव अर्जुन! (तू) | **विद्धि** | = समज | **ज्ञानम्** | = ज्ञान आहे, |
| **सर्वक्षेत्रेषु** | = संपूर्ण क्षेत्रांत | **च** | = आणि | **तत्** | = तेच |
| **क्षेत्रज्ञम्** | = क्षेत्रज्ञ | **क्षेत्र क्षेत्रज्ञयोः** | = क्षेत्र-क्षेत्रज्ञाचे | **मम** | = माझ्या |
| **माम्, अपि** | = मलाच | **यत्** | = जे | **मतम्** | = मतात |
| | | | | **ज्ञानम्** | = ज्ञान आहे. |

***व्याख्या*— क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत—**संपूर्ण क्षेत्रांत (शरीरांत) "मी आहे" असा जो अहंभाव आहे, त्यात "मी" तर क्षेत्र आहे (ज्याला पूर्व श्लोकात **'एतत्'** म्हटले आहे) आणि "एकदेशीय आहे" मी पणाचा ज्ञाता क्षेत्रज्ञ आहे. (ज्याला पूर्व श्लोकात **'वेत्ति'** पदाने जाणणारा म्हटले आहे), "मी" चा संबंध असल्यानेच "एकदेशीय आहे" आहे. जर "मी" चा संबंध राहीला नाही तर "एकदेशीय आहे" राहणार नाही तर फक्त "सर्वव्यापक आहे" (सत्) च राहील. कारण "सर्वव्यापक आहे" च "मी" शी संबंध ठेवत असल्यामुळे "एकदेशीय आहे" म्हटला जातो. म्हणून वास्तविक क्षेत्रज्ञाचे ("एकदेशीय आहे") परमात्म्याशी, "सर्वव्यापक आहे" शी ऐक्य आहे. याच गोष्टीला भगवान्

येथे म्हणत आहे की, संपूर्ण क्षेत्रांमध्ये मलाच क्षेत्रज्ञ समज.

मनुष्य ज्या विषयाला जाणत असतो, तो जाणण्यात येणारा विषय ''ज्ञेय'' म्हणविला जातो. त्या ज्ञेयाला तो कोण्यातरी करणाद्वारेच जाणत असतो. करण दोन प्रकारचे असतात. बहि:करण आणि अंत:करण. मनुष्य विषयांना बहि:करणांनी (श्रोत्र, नेत्र इत्यादी) जाणत असतो आणि बहि:करणांना अंत:करणाने (मन, बुद्धी इत्यादी) जाणत असतो. त्या अंत:करणाच्या चार वृत्ती आहेत—मन, बुद्धी, चित्त, अहंकार. या चारीतही अहंकार सर्वात सूक्ष्म आहे, तो एकदेशीय आहे. ह्या अहंकारालाही ज्याने पाहिले जाते, जाणले जाते, तो जाणणारा प्रकाशस्वरूप क्षेत्रज्ञ आहे. त्या अहंभावाच्याही ज्ञात्या क्षेत्रज्ञाला साक्षात माझे स्वरूप समज.

येथे ''**विद्धि**'' पद म्हणण्याचे तात्पर्य, हे अर्जुन! जसे तू स्वत:ला शरीर मानतोस आणि शरीराला आपले मानतोस, तसेच तू स्वत:ला माझ्यात आहेस असे जाण (मान) आणि मला आपले समज. कारण तू शरीराशी जी एकता मानली आहेस, तिचा त्याग करण्यासाठी माझ्याशी ऐक्य मानणे फार आवश्यक आहे.

जसे येथे भगवंतांनी ''**क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि**'' पदांनी क्षेत्रज्ञाचे आपल्याशी ऐक्य दाखविले आहे, तसेच गीतेमध्ये अन्य ठिकाणीही ऐक्य दाखविले आहे. जसे दुसऱ्या अध्यायाच्या सतराव्या श्लोकात भगवंतांनी शरीरी (क्षेत्रज्ञ) साठी म्हटले की, ''ज्याने हा संपूर्ण संसार व्याप्त आहे त्याला तू अविनाशी समज''—''**अविनाशी तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम्।**'' आणि नवव्या अध्यायाच्या चौथ्या श्लोकात आपल्यासाठी म्हटले की, ''माझ्याने हा संपूर्ण संसार व्याप्त आहे''—''**मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना।**''. येथे तर भगवंतांनी क्षेत्रज्ञाचे (अंश) आपल्याशी (अंशी) ऐक्य दाखविले आहे आणि पुढे याच अध्यायाच्या चौतीसाव्या श्लोकात शरीर-संसाराचे (कार्य) प्रकृतीशी (कारण) ऐक्य दाखवितील. तात्पर्य, शरीर तर प्रकृतीचा अंश आहे, म्हणून तू यापासून संपूर्णपणे विमुख हो आणि तू माझा अंश आहेस, म्हणून मला सम्मुख हो.

शरीराची संसाराशी स्वाभाविक एकता आहे, परंतु हा जीव शरीराला संसारापासून वेगळे समजून त्याच्याशी आपले ऐक्य मानतो. परमात्म्याशी क्षेत्रज्ञाचे स्वाभाविक ऐक्य असतानाही शरीराशी ऐक्य मानल्याने हा स्वत: आपल्याला परमात्म्यापासून वेगळा मानतो. शरीराला संसारापासून वेगळे मानणे आणि स्वत: आपल्याला परमात्म्यापासून वेगळे मानणे या दोन्ही मान्यता चुकीच्या आहेत. म्हणून भगवान् येथे ''**विद्धि**'' पदाने आज्ञा करीत आहेत की, क्षेत्रज्ञ मीच आहे, असे समज. तात्पर्य, तू जसे शरीराशी आपले ऐक्य मानले आहेस त्याऐवजी माझ्याशी ऐक्य मानून घे, जे ऐक्य वास्तविक आहे.

शास्त्रात प्रकृती, जीव आणि परमात्मा—या तिन्हींचे वेग- वेगळे वर्णन येते. परंतु येथे ''**अपि**'' पदाने भगवान् एका विलक्षण भावाकडे लक्ष करवीत आहेत की, शास्त्रात परमात्म्याच्या ज्या सर्वव्यापक स्वरूपाचे वर्णन झाले आहे, तो तर मी आहेच, या बरोबरच संपूर्ण क्षेत्रामध्ये क्षेत्रज्ञरूपाने वेग वेगळा दिसणाराही मीच आहे. म्हणून प्रस्तुत पदांचा हाच भाव आहे की, क्षेत्रज्ञरूपाने जीव (स्व) परमात्माच आहे—असे जाणून साधकाने माझ्याशी अभिन्नतेचा अनुभव करावा.

स्व संसाराहून भिन्न आणि परमात्म्याशी अभिन्न आहे. म्हणून हा नियम आहे की, जेव्हा संसाराशी संपूर्णपणे भिन्नतेचा अनुभव केला जाईल, तेव्हा संसाराचे ज्ञान झाले असे समजले जाईल. तात्पर्य, संसाराशी आसक्तिरहित होऊनच संसाराच्या वास्तविक स्वरूपाला जाणून घेतले जाऊ शकते. परंतु परमात्म्याचे ज्ञान त्यांच्याशी अभिन्न होऊनच, होत असते. म्हणून परमात्म्याचे यथार्थ ज्ञान करविण्यासाठी, भगवान् क्षेत्रज्ञाशी आपली अभिन्नता दाखवित आहेत. या अभिन्नतेला यथार्थरूपाने जाणून घेतल्यास, परमात्म्याचे वास्तविक ज्ञान होत असते.

**क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम**—क्षेत्राची (शरीर) संपूर्ण संसाराशी एकता आहे आणि क्षेत्रज्ञाची (जीवात्मा) माझ्याशी एकता आहे—असे जे क्षेत्र-क्षेत्रज्ञाचे ज्ञान आहे, तेच माझ्या मताने यथार्थ ''ज्ञान'' आहे.

''**मतं मम**'' म्हणण्याचे तात्पर्य, संसारात अनेक विद्या, अनेक भाषा, अनेक लिपी, अनेक कला, तीन लोक आणि चौदा भुवने यांचे जे ज्ञान आहे, ते वास्तविक ज्ञान नव्हे. कारण ते ज्ञान सांसारिक व्यवहारात कामी येत असून, संसारात फसविणारे असल्याने अज्ञानच आहे. वास्तविक ज्ञान तर तेच आहे, जे झाल्याने स्व चा शरीराशी संबंध-विच्छेद होईल आणि पुन्हा या संसारात जन्माला यावे लागणार नाही, संसाराची परतंत्रता राहणार नाही. हेच ज्ञान भगवंताच्या मतामध्ये यथार्थ ज्ञान आहे.

**परिशिष्ट भाव**—क्षेत्रज्ञ (जीव) आणि ब्रह्म एकच आहे. एका क्षेत्राच्या संबंधाने ते 'क्षेत्रज्ञ' आहे आणि संपूर्ण क्षेत्रांच्या संबंधाने रहित झाल्यास ते 'ब्रह्म' आहे.

'**इदं शरीरं कौन्तेय क्षेत्रम्**' पदांने हे सिद्ध झाले की, शरीराचे (क्षेत्राचे) अनंत ब्रह्मांडांशी (संपूर्ण सृष्टीशी) ऐक्य आहे

आणि '**क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि**' पदांने हे सिद्ध झाले की, स्वयंचे (क्षेत्रज्ञाचे) अनंत-अपार-असीम परमात्म्याशी ऐक्य आहे. म्हणून आपल्यापासून दूराती दूर कोणती वस्तू असेल तर ते शरीर आहे आणि जवळाती जवळ कोणती वस्तू असेल तर तो परमात्मा आहे. तात्पर्य हे आहे की, शरीर आणि संसार एक आहे तसेच स्वयं आणि परमात्मा एक आहे (गीता—१५-७) हेच ज्ञान आहे.

ब्रह्मासाठी '**माम्**' म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, ब्रह्म आणि ईश्वर दोन नाहीत, तर एकच आहेत—'**मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना**' (गीता ९।४) 'हा सर्व संसार माझ्या निराकारस्वरूपाने व्याप्त आहे.' अनंत ब्रह्मांडांत जे निर्लिप्तरूपाने सर्वत्र परिपूर्ण चेतन आहे, ते ब्रह्म आहे आणि जो अनंत ब्रह्मांडांचा मालक आहे, तो ईश्वर आहे.

***संबंध***—*पूर्व श्लोकात क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांचेच ज्ञान यथार्थ ज्ञान आहे, असे आपले मत सांगून, आता भगवान क्षेत्र-क्षेत्रज्ञाचा विभाग ऐकण्याविषयी आज्ञा करत आहेत.*

**तत्क्षेत्रं यच्च यादृक्च यद्विकारि यतश्च यत्।**
**स च यो यत्प्रभावश्च तत्समासेन मे शृणु॥ ३॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तत्** | = ते | **च** | = आणि | **च** | = आणि |
| **क्षेत्रम्** | = क्षेत्र | **यतः** | = ज्यापासून | **यत्प्रभावः** | = ज्या प्रभावाने युक्त आहे, |
| **यत्** | = जे आहे | **यत्** | = जे (उत्पन्न झाले आहे) | **तत्** | = ते सर्व |
| **च** | = आणि | | | | |
| **यादृक्** | = जसे आहे | **च** | = तसेच | **समासेन** | = संक्षेपाने |
| **च** | = तसेच | **सः** | = तो क्षेत्रज्ञ (ही) | **मे** | = माझ्याकडून |
| **यद्विकारि** | = ज्या विकारांचे आहे | **यः** | = जो आहे | **शृणु** | = ऐक |

*व्याख्या*— **तत्क्षेत्रम्**—"**तत्**" शब्द दोन्हींचा वाचक असतो—पूर्वी सांगितलेल्या विषयाचा आणि दूरतेचा! याच अध्यायाच्या पहिल्या श्लोकात ज्याला "**इदम्**" पदाने म्हटले गेले आहे, त्यालाच येथे "तत्" पदाने म्हटले आहे. क्षेत्र सर्व देशात नसते, सर्व काळात नसते आणि आत्ताही प्रत्येक क्षणाला अभावात जात आहे. ही क्षेत्राची (स्व शी) दूरता आहे.

**यच्च**—त्या क्षेत्राचे जे स्वरूप आहे, ज्याचे वर्णन याच अध्यायाच्या पाचव्या श्लोकात झाले आहे.

**यादृक् च**—त्या क्षेत्राचा जसा स्वभाव आहे, त्याचे वर्णन याच अध्यायाच्या सव्वीसाव्या-सत्तावीसाव्या श्लोकांत त्याला उत्पन्न आणि नष्ट होणारा दाखवून केले गेले आहे.

**यद्विकारि**—जरी प्रकृतीचे कार्य असल्याने याच अध्यायाच्या पाचव्या श्लोकात आलेल्या तेवीस तत्त्वांनाही विकार म्हटले गेले आहे, तरी येथे उपर्युक्त पदाने क्षेत्र क्षेत्रज्ञाच्या मानलेल्या संबंधामुळे क्षेत्रात उत्पन्न होणाऱ्या इच्छा द्वेषादी विकारांनाच विकार म्हटले गेले आहे, ज्याचे वर्णन सहाव्या श्लोकात झाले आहे.

**यतश्च यत्**—हे क्षेत्र ज्यापासून उत्पन्न होते अर्थात् प्रकृतीपासून उत्पन्न होणारे सात विकार आणि तीन गुण, त्यांचे वर्णन याच अध्यायाच्या एकोणीसाव्या श्लोकाच्या उत्तरार्धात झाले आहे.

**स च**—पहिल्या श्लोकाच्या उत्तरार्धात ज्या क्षेत्रज्ञाचे वर्णन झाले आहे, त्याच क्षेत्रज्ञाचा वाचक येथे "**सः**" पद आहे आणि त्याच्याच विषयात येथे ऐकण्यासाठी म्हटले जात आहे.

**यः**—या क्षेत्रज्ञाचे जे स्वरूप आहे, त्याचे वर्णन याच अध्यायाच्या वीसाव्या श्लोकाच्या उत्तरार्धात आणि बाविसाव्या श्लोकात केले गेले आहे.

**यत्प्रभावश्च**—ते क्षेत्रज्ञ ज्या प्रभावाचे आहे त्याचे वर्णन याच अध्यायाच्या एकतीसाव्यापासून तेहतीसाव्या श्लोकापर्यंत केले गेले आहे.

**तत्समासेन मे शृणु**—येथे "**तत्**" पदाच्या अंतर्गत क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ दोन्हींना समजावे. तात्पर्य, ते क्षेत्र जे आहे, जसे आहे, ज्या विकारांनी युक्त आहे आणि ज्यापासून उत्पन्न झाले आहे—अशा प्रकारे क्षेत्राविषयी चार मुद्दे आणि ते क्षेत्रज्ञ जे आहे आणि ज्या प्रभावाने युक्त आहे—अशा प्रकारे क्षेत्रज्ञाविषयी दोन मुद्दे तू माझ्याकडून संक्षेपाने ऐक.

जरी या अध्यायाच्या आरंभी पहिल्या दोन श्लोकांत क्षेत्र-क्षेत्रज्ञाचे सूत्ररूपाने वर्णन झाले आहे, ज्याला भगवंतांनी "ज्ञान" देखील म्हटले आहे, तरी क्षेत्र-क्षेत्रज्ञाच्या विभागाचे स्पष्टरूपाने विवेचन (विकारसहित क्षेत्र आणि निर्विकार

क्षेत्रज्ञाच्या स्वरूपाचे प्रभावसहित विवेचन) या तीसऱ्या श्लोकापासून आरंभ केले गेलेले आहे. म्हणून भगवान् हे सावध होऊन ऐकण्याची आज्ञा करत आहेत.

या श्लोकात भगवंतांनी क्षेत्राच्या विषयात चार मुद्दे परंतु क्षेत्रज्ञाच्या विषयात केवळ दोन मुद्दे—स्वरूप आणि प्रभावच, ऐकण्याची आज्ञा केली आहे. यामुळे अशी शंका येऊ शकते की, क्षेत्राचा प्रभावही का सांगितला गेला नाही आणि त्याचबरोबर क्षेत्रज्ञाचा स्वभाव, विकार आणि ज्यापासून ते उत्पन्न झाले—या विषयावरही का विवेचन केले गेले नाही? याचे समाधान असे आहे की, एक क्षणही एकारूपात स्थिर न राहणाऱ्या क्षेत्राचा प्रभाव काय असू शकतो? प्रकृतिस्थ (संसारी) पुरुषाच्या अंतःकरणात धनादी जड पदार्थांचे महत्त्व राहत असते, म्हणूनच त्याला संसारात क्षेत्राचा (धनादी जड पदार्थांचा) प्रभाव दिसतो. वास्तविक स्वतंत्ररूपाने क्षेत्राचा मुळीच प्रभाव नसतो. म्हणून त्याच्या प्रभावाचे कोणतेही वर्णन केले गेले नाही.

क्षेत्रज्ञाचे स्वरूप उत्पत्ति-विनाशरहित आहे, म्हणून त्याचा प्रभावही उत्पत्ति-विनाशरहित आहे. म्हणून भगवंतांनी त्याच्या स्वभावाचे वेगळे वर्णन न करता, स्वरूपाच्या अंतर्गतच केले आहे. क्षेत्राशी आपला संबंध मानल्यानेच क्षेत्रज्ञात इच्छा-द्वेषादी विकारांची प्रतीति होत असते, नाही तर क्षेत्रज्ञ (स्वरूपाने) संपूर्णपणे निर्विकारच आहे. म्हणून निर्विकार क्षेत्रज्ञाच्या विकारांचे वर्णन होणे शक्यच नाही. क्षेत्रज्ञ अद्वितीय, अनादी आणि नित्य आहे. म्हणून त्याच्या विषयात "कोण कोणापासून उत्पन्न झाले" हा प्रश्नच उद्भवत नाही.

**परिशिष्ट भाव**—भगवंताद्वारा '**तत्समासेन मे शृणु**' म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, साधकासाठी अधिक जाणण्याची आवश्यकता नाही. अधिक जाणण्यात वेळ तर अधिक खर्च होईल परंतु साधन कमी होईल.

***संबंध***—*पूर्व श्लोकात ज्याला संक्षेपाने ऐकण्यासाठी म्हटले गेले आहे, त्याचे विस्ताराने वर्णन कुठे झाले आहे—ही गोष्ट पुढील श्लोकात सांगत आहेत.*

**ऋषिभिर्बहुधा गीतं छन्दोभिर्विविधैः पृथक्।**
**ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः॥४॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **ऋषिभिः** | = ऋषींद्वारा | **छन्दोभिः** | = वेदांच्या ऋचांद्वारा | **च** | = आणि |
| **बहुधा** | = पुष्कळ विस्ताराने | **विविधैः** | = पुष्कळ प्रकाराने | **हेतुमद्भिः** | = युक्तियुक्त (व) |
| | | **पृथक्** | = विभागपूर्वक (सांगितले गेले आहे) | **विनिश्चितैः** | = निश्चित केलेल्या |
| **गीतम्** | = सांगितले गेले आहे (तसेच) | | | **ब्रह्मसूत्रपदैः** | = ब्रह्मसूत्र पदांद्वाराही |
| | | | | **एव** | (सांगितलेगेलेआहे). |

*व्याख्या*— **ऋषिभिर्बहुधा गीतम्**—वैदिक मंत्रांचे द्रष्टे तसेच शास्त्र, स्मृती आणि पुराण रचयित्या ऋषींनी आपापल्या (शास्त्र-स्मृती इत्यादी) ग्रंथात, जड-चेतन, सत्-असत्, शरीर-शरीरी, देह-देही, नित्य-अनित्य इत्यादी शब्दांनी क्षेत्र-क्षेत्रज्ञाचे पुष्कळ विस्ताराने वर्णन केले आहे.

**छन्दोभिर्विविधैः पृथक्**—येथे "**विविधैः**" विशेषणसहित "**छन्दोभिः**" पद ऋक्, यजुः, साम आणि अथर्व—या चार वेदांच्या "संहिता" आणि "ब्राह्मण" भागांच्या मंत्रांचे वाचक आहे. यांच्याच अंतर्गत संपूर्ण उपनिषद् आणि वेगवेगळ्या शाखा देखील येतात. यात क्षेत्र-क्षेत्रज्ञाचे वेग-वेगळे वर्णन केले गेले आहे.

**ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः**—अनेक युक्तींनी युक्त तसेच उत्तम प्रकाराने निश्चित केलेल्या ब्रह्मसूत्राच्या पदांद्वाराही क्षेत्र-क्षेत्रज्ञाच्या तत्त्वाचे वर्णन केले गेले आहे. या श्लोकात भगवंताचा आशय असा दिसतो की, क्षेत्र-क्षेत्रज्ञाचे जे संक्षेपाने मी वर्णन करत आहे, त्याला जर कोणी विस्ताराने पाहू इच्छिल तर तो उपर्युक्त ग्रंथात पाहू शकतो.

***संबंध***—*तीसऱ्या श्लोकात क्षेत्र-क्षेत्रज्ञाच्या विषयात ज्या सहा मुद्यांना संक्षेपाने ऐकण्याची आज्ञा दिली होती, त्यापैकी क्षेत्राच्या दोन मुद्यांचे अर्थात् त्याचे स्वरूप आणि विकारांचे वर्णन पुढील दोन श्लोकांत करत आहेत.*

**महाभूतान्यहङ्कारो बुद्धिरव्यक्तमेव च।**
**इन्द्रियाणि दशैकं च पञ्च चेन्द्रियगोचराः॥५॥**

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| अव्यक्तम् | = मूळ प्रकृती | महाभूतानि | = पंचमहाभूते | च | = तसेच |
| च | = आणि | च | = आणि | पञ्च | = पाच |
| बुद्धिः | = समष्टी बुद्धी (महत्तत्त्व), | दश | = दहा | इन्द्रियगोचराः | = इंद्रियांचे पाच विषय— |
| अहंकार | = समष्टी अहंकार, | इन्द्रियाणि | = इंद्रिये, | एव | = हेच (चोवीस तत्त्व असलेले क्षेत्र आहे). |
| | | एकम् | = एक मन | | |

*व्याख्या*— **अव्यक्तमेव च**—मूळ प्रकृतीला अव्यक्त म्हणतात. मूळ प्रकृती समष्टी बुद्धीचे कारण असल्याने आणि स्व कोणाचेही कार्य नसल्याने केवळ ''प्रकृती'' च आहे.

**बुद्धिः**—हे पद समष्टी बुद्धी अर्थात् महत्तत्त्वाचे वाचक आहे. या बुद्धीपासून अहंकार उत्पन्न होतो, म्हणून ही ''प्रकृती'' आहे. तात्पर्य, ही बुद्धी ''प्रकृती-विकृती'' आहे.

**अहंकारः**—हे पद समष्टी अहंकाराचे वाचक आहे. याला अहंभावही म्हणतात. पंचमहाभूतांचे कारण असल्याने हा अहंकार ''प्रकृती'' आहे आणि बुद्धीचे कार्य असल्याने हा ''विकृती'' आहे. तात्पर्य, हा अहंकार ''प्रकृती-विकृती'' आहे.

**महाभूतानि**—पृथ्वी, आप, तेज, वायू आणि आकाश—ही पाच महाभूते आहेत. महाभूते दोन प्रकारची आहेत—पञ्चीकृत आणि अपञ्चीकृत. एका एका महाभूताचे पाच विभाग होऊन जे मिश्रण होत असते, त्याला पञ्चीकृत महाभूते म्हणतात. *विभागरहित महाभूतांना ''अपंचीकृत'' महाभूते म्हणतात. येथे याच अपंचीकृत महाभूतांचा वाचक ''**महाभूतानि**'' पद आहे. या महाभूतांना ''पञ्चतन्मात्रा'' तसेच ''सूक्ष्ममहाभूत'' ही म्हणतात.

दहा इंद्रिये, एक मन आणि शब्दादी पाच विषयांचे कारण असल्यामुळे ही महाभूते 'प्रकृती' आहेत आणि अहंकाराचे कार्य असल्याने ही ''विकृती'' आहेत. तात्पर्य, ही पञ्चमहाभूते प्रकृती-विकृती आहेत.

**इन्द्रियाणि दश**—श्रोत्र, त्वचा, नेत्र, रसना आणि घ्राण—ही पांच ज्ञानेंद्रिये आहेत, तसेच वाक्, पाणी, (हात), पाय, उपस्थ आणि पायु—ही पाच कर्मेंद्रिये आहेत. ही दहाही इंद्रिये अंपचीकृत महाभूतापासून उत्पन्न झाल्याने आणि स्वत: कोणाचेही कारण नसल्याने, केवळ ''विकृती'' च आहेत.

**एकं च**—अपंचीकृत महाभूतापासून उत्पन्न झाल्याने आणि स्वत: कोणाचेही कारण नसल्याने, मन केवळ ''विकृति'' च आहे.

**पञ्च चेन्द्रियगोचराः**—शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे (पाच ज्ञानेंद्रियाचे) पाच विषय आहेत. अपंचीकृत महाभूतापासून उत्पन्न झाल्याने आणि स्वत: कोणाचेही कारण नसल्याने हे पाचही विषय केवळ ''विकृती'' च आहेत.

या सर्वांचा हा निष्कर्ष निघाला की, पाच महाभूत, एक अहंकार आणि एक बुद्धी—हे सात ''प्रकृती-विकृती'' आहेत, मूळ प्रकृती केवळ ''प्रकृती'' आहे. आणि दहा इंद्रिये, एक मन आणि पाच ज्ञानेंद्रियांचे विषय—ह्या सोळा केवळ ''विकृती'' आहेत. अशा प्रकारे या चोवीस तत्त्वाच्या समुदायाचे नाव ''क्षेत्र'' आहे. याचेच एक तुच्छ अंग हे मनुष्यशरीर आहे. ज्याला भगवंतांनी पहिल्या श्लोकात ''**इदं शरीरम्**'' आणि तीसऱ्या श्लोकात ''**तत्क्षेत्रम्**'' पदाने म्हटले आहे.

**इच्छा द्वेषः सुखं दुःखं सङ्घातश्चेतना धृतिः।**
**एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम्॥ ६॥**

---

* आकाशाचे दोन विभाग आहेत ज्यापैकी अर्धा भाग आकाश आपल्यास्वरूपाने राहिला आणि दुसऱ्या अर्ध्या भागाचे चार विभाग केले. त्यापैकी एक भाग वायूला, एक भाग तेजाला, एक भाग पाण्याला आणि एक भाग पृथ्वीला दिला (पंचीकृत आकाश)

वायूचे दोन विभाग आहेत. ज्यापैकी अर्धा भाग वायू आपल्यास्वरूपाने राहिला आणि दुसऱ्या अर्ध्या भागाचे चार भाग केले. ज्यांना क्रमशः आकाश, तेज, जल आणि पृथ्वी यांना दिले. (पंचीकृत वायू)

तेजाचे दोन विभाग आहेत. ज्यापैकी अर्धा भाग तेज आपल्यास्वरूपाने राहिला आणि दुसऱ्या अर्ध्या भागाचे चार भाग केले. ज्यांना क्रमाने आकाश, वायू, पाणी आणि पृथ्वी यांना दिले (पंचीकृत तेज)

जलाचे दोन विभाग आहेत. ज्यापैकी अर्धा भाग जल आपल्यास्वरूपाने राहिला आणि दुसऱ्या अर्ध्या भागाचे चार भाग केले. ज्यांना क्रमाने आकाश, वायू, तेज आणि पृथ्वी यांना दिले (पंचीकृत जल)

पृथ्वीचे दोन विभाग आहेत. ज्यापैकी अर्धा भाग पृथ्वी आपल्यास्वरूपाने राहिली आणि दुसऱ्या अर्ध्या भागाचे चार भाग केले. ज्यांना क्रमाने आकाश, वायू, तेज आणि जल यांना दिले. (पंचीकृत पृथ्वी)

अशा प्रकारे पांचही महाभूतांचे पञ्चीकरण-मिश्रण झाल्याने याला ''पञ्चीकृत महाभूत'' म्हणतात.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **इच्छा** | = इच्छा, | **चेतना** | = चेतना (प्राणशक्ती) (आणि) | **एतत्** | = हे |
| **द्वेषः** | = द्वेष, | | | **क्षेत्रम्** | = क्षेत्र |
| **सुखम्** | = सुख, | | | **समासेन** | = संक्षेपाने |
| **दुःखम्** | = दुःख, | **धृतिः** | = धृती— | **उदाहृतम्** | = सांगितले गेले आहे. |
| **सङ्घातः** | = संघात (शरीर), | **सविकारम्** | = या विकारांसहित | | |

***व्याख्या*— इच्छा**—अमुक वस्तू, व्यक्ती, परिस्थिती इत्यादी मिळावे अशी जी मनात कामना होते, त्याला ''इच्छा'' म्हणतात. क्षेत्राच्या विकारामध्ये भगवान् सर्वात प्रथम इच्छारूपी विकाराचे नाव घेतात. याचे तात्पर्य, इच्छा मूळ विकार आहे; कारण असे कोणतेही पाप आणि दुःख नाही, जे सांसारिक इच्छेने उत्पन्न होत नाही अर्थात् संपूर्ण पाप आणि दुःख सांसारिक इच्छेनेच उत्पन्न होतात.

**द्वेषः**—कामना आणि अभिमानात बाधा आल्याने क्रोध उत्पन्न होतो. अंतःकरणात त्या क्रोधाचे जे सूक्ष्म रूप राहत असते, त्याला ''द्वेष'' म्हणतात. येथे ''**द्वेषः**'' पदाचे अंतर्गत क्रोधालाही गृहित धरावे.

**सुखम्**—अनुकूलता प्राप्त झाल्यावर मनात जी प्रसन्नता येते; अर्थात् अनुकूल परिस्थितीच्या मनाला आवडण्याला, ''सुख'' म्हणतात.

**दुःखम्**—प्रतिकूलता प्राप्त झाली असता मनात जी चलबिचल होते; अर्थात् प्रतिकूल परिस्थितीचे मनाला न आवडणे त्याला ''दुःख'' म्हणतात.

**सङ्घात**—चोवीस तत्त्वापासून बनलेल्या शरीररूपी समूहाचे नाव ''सङ्घात'' आहे. शरीराचे उत्पन्न होऊन सत्ता-रूपाने दिसणेही, विकार आहे तसेच त्यामध्ये प्रत्येक क्षणाला परिवर्तन होत राहणेही विकार आहे.

**चेतना**—प्राण शक्तीचे नाव ''चेतना'' आहे अर्थात् शरीरात जे प्राण चालत असतात, त्याचे नाव ''चेतना'' आहे. या चेतनेत परिवर्तन होत राहते. जसे सात्त्विक वृत्ती निर्माण झाली असता प्राणशक्ती शांत राहत असते आणि चिंता, शोक, भय, उद्वेग इत्यादी निर्माण झाल्यास प्राणशक्ती तशी शांत राहत नसते, क्षुब्ध होत असते. ही प्राणशक्ती निरंतर नष्ट होत राहते. म्हणून हीसुद्धा विकाररूपच आहे.

सामान्य लोक प्राण असलेल्यास चेतन आणि निष्प्राण असलेल्यास अचेतन म्हणतात, या दृष्टीने येथे प्राणशक्तीला चेतन म्हटले गेले आहे.

**धृतिः**—धारणाशक्तीला ''धृती'' म्हणतात. ही धृतीही बदलत राहते. मनुष्य कधी धैर्य धारण करतो आणि कधी (प्रतिकूल परिस्थिती आल्यास) धैर्य सोडून देतो. कधी धैर्य जास्त असते, तर कधी कमी राहते. मनुष्य कधी उत्तम गोष्ट धारण करतो आणि कधी विपरीत गोष्ट धारण करतो, म्हणून धृती ही क्षेत्राचा विकार आहे.

[अठराव्या अध्यायाच्या तेहतीसाव्यापासून पस्तीसाव्या श्लोकापर्यंत धृतीच्या सात्त्विक, राजस, आणि तामस—या तीन भेदांचे वर्णन केले गेले आहे. परमात्म्याकडे आकृष्ट होण्यात सात्त्विक धृतीची फार मोठी आवश्यकता असते]

**एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम्**—जसे पहिल्या श्लोकात ''**इदं शरीरम्**'' म्हणून व्यष्टी शरीरापासून स्वतःला वेगळे पाहण्यासाठी सांगितले, तसेच दृश्यापासून (क्षेत्र आणि त्यामध्ये होणारे विकार) द्रष्टा वेगळा दाखविण्यासाठी येथे ''**एतत्**'' पद आले आहे.

पाचव्या श्लोकात भगवंतांनी समष्टी संसाराचे वर्णन केले आणि येथे सहाव्या श्लोकात व्यष्टी शरीराच्या विकारांचे वर्णन केले आहे, कारण समष्टी संसारात इच्छा-द्वेषादी विकार होतच नसतात. तात्पर्य, व्यष्टी शरीर समष्टी संसारा-पासून आणि समष्टी संसार व्यष्टी शरीरापासून वेगळा नाही अर्थात् हे दोन्ही एकच आहेत. जसे, या अध्यायाच्या दुसऱ्या श्लोकात भगवंतांनी, क्षेत्रज्ञाशी आपले ऐक्य दाखविले, तसेच येथे व्यष्टी शरीर आणि त्यात होणाऱ्या विकारांची समष्टी संसाराशी एकता दाखवितात. पुढे एकवीसाव्या श्लोकात भगवंतांनी पुरुषाची स्थिती शरीरात न सांगता, प्रकृतीत सांगितली आहे. ''**पुरुषः प्रकृतिस्थो हि**''. यावरुनही सिद्ध होते की, पुरुषाची स्थिती (संबंध) व्यष्टी शरीरात झाल्याने, त्याची स्थिती समष्टी प्रकृतीत होत असते, कारण व्यष्टी शरीर आणि समष्टी प्रकृती—दोन्ही एकच आहेत. वास्तविक पाहिले तर, व्यष्टी नाहीच, केवळ समष्टीच आहे. व्यष्टी केवळ चुकीने मानले आहे. जसे समुद्राच्या लाटांना समुद्रापासून वेगळे समजणे चूक आहे, तसेच व्यष्टी शरीराला समष्टी संसारापासून वेगळे (आपले) समजणे चूकच आहे.

## विशेष गोष्ट

क्षेत्रज्ञ जेव्हा अविवेकाने क्षेत्राशी आपला संबंध मानतो, तेव्हा क्षेत्रात इच्छा-द्वेषादी विकार उत्पन्न होतात. क्षेत्रज्ञाचे वास्तविक स्वरूप तर संपूर्णपणे निर्विकारच आहे. क्षेत्र-क्षेत्रज्ञाच्या संयोगाने उत्पन्न होणारे विकार संपूर्णपणे नष्ट केले जाऊ शकतात, कारण क्षेत्रज्ञाचा क्षेत्राशी संयोग केवळ

मानलेला आहे. या मानलेल्या संयोगाला नष्ट करण्यासाठी भगवान् या अध्यायाच्या पहिल्या श्लोकात शरीराला स्वत:-पासून वेगळे पाहण्यासाठी आणि नंतर दुसऱ्या श्लोकात परमात्म्याशी आपल्या नित्य संयोगाचा (एकता) अनुभव करण्यासाठी सांगतात. असा अनुभव झाल्यास क्षेत्राशी मानलेल्या एकतेचा संपूर्णपणे अभाव होऊन जातो आणि मग विकार उत्पन्नच होऊ शकत नाहीत.

बोध झाल्यावर अर्थात् क्षेत्राशी (शरीर) सर्वथा संबंध-विच्छेद झाल्यावर ''इच्छा'' आणि ''द्वेष'' पूर्णपणे कायमचे समाप्त होतात. ''सुख'' आणि ''दु:ख'' अर्थात् अनुकूल आणि प्रतिकूल परिस्थितीचे ज्ञान तर होत असते, परंतु त्या- पासून अंत:करणात कोणता विकार उत्पन्न होत नाही, अर्थात् अनुकूल-प्रतिकूल परिस्थिती प्राप्त झाली असता, जीवन्मुक्त महापुरुष सुखी-दु:खी होत नाही. सुख-दु:खाचे ज्ञान होणे दोष नाही, तर त्याचा परिणाम होणे (विकार होणे) दोष आहे.*

जीवन्मुक्त महापुरुषाचा ''संघात'' अर्थात् शरीराशी किंचिन्मात्रही ''मी-माझे'' पणाचा संबंध राहत नसल्यामुळे, त्याचे म्हणविले जाणारे शरीर जरी महान् पवित्र होत असते, तरीही प्रारब्धानुसार त्याचे हे शरीर राहतच असते. जोपर्यंत, शरीर राहत असते तोपर्यंत चेतनासुद्धा (प्राणशक्ती) राहत असते. परिश्रम झाल्यास त्याच्यात चंचलता निर्माण होते, नाही तर ती शांत राहते. साधनावस्थेत जी सात्त्विकी ''धृति'' होती, ती बोध झाल्यावरही राहत असते. परंतु अंत: करणाशी तादात्म्य न राहिल्याने तत्त्वज्ञ महापुरुषाचा, ''चेतना'' आणि ''धृती'' रूपी विकाराशी कोणताही संबंध राहत नाही.

तात्पर्य, शरीराशी तादात्म्य झाल्याने जे विकार उत्पन्न होतात, ते विकार बोध झाल्यावर उत्पन्न होत नाहीत. संघात, चेतना आणि धृतिरूपी विकार राहत असतानाही त्यांचा स्ववर (क्षेत्रज्ञावर) काहीही परिणाम होत नाही.

**परिशिष्ट भाव**—क्षेत्राशी संबंध ठेवल्यानेच इच्छा, द्वेष, सुख, दु:ख इत्यादी विकार क्षेत्रज्ञात होतात—'**पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते**' (१३। २०). इच्छा, द्वेष इत्यादी सर्वच विकार तादात्म्यात (जड-चेतनाच्या ग्रंथीत) आहेत. तादात्म्यातही हे विकार जड-अंशात राहतात.

येथे भगवंताने चोवीस तत्त्वाचे शरीर आणि त्याच्या सात विकारांना '**एतत्**' (हे) म्हटले आहे—'**एतत्क्षेत्रम्**' याचे तात्पर्य हे आहे की, स्वयं क्षेत्राशी मिळालेला नाही, तर संपूर्णपणे वेगळा आहे. स्थूल, स्थूल आणि कारण—तिन्हीही शरीर '**एतत्**' पदाच्या अंतर्गत असल्याने आपले स्वरूप नव्हे. येथे विशेष ध्यानात ठेवण्याची गोष्ट ही आहे की, जर अहंकाराचे कारण असलेल्या 'महत्तत्त्व' आणि 'मूल प्रकृती' यांनाही '**एतत्**' शब्दाने सांगितले तर मग अहंकार '**एतत्**' च्या अंतर्गत असण्यात काय हरकत आहे? अहमूहून जवळ महत्तत्त्व आहे आणि महत्त्वाहून जवळ प्रकृती आहे, ती प्रकृतीही '**एतत् क्षेत्रम्**' यात आहे. तात्पर्य हे आहे की, अहम् आपले स्वरूप नाहीच. जो मनुष्य स्वयं आणि अहम् (क्षेत्र) यांना वेग-वेगळे जाणतो, त्याचा कधी पुनर्जन्म होत नाही आणि तो परमात्म्याला प्राप्त होतो. (गीता तेराव्या अध्यायाचा तेवीसावा श्लोक).

***संबंध***—*शरीराशी तादात्म्य करून घेतल्यानेच इच्छा, द्वेष इत्यादी विकार उत्पन्न होतात आणि त्या विकारांचा स्ववर परिणाम होतो. म्हणून भगवान् शरीराशी केलेल्या तादात्म्याला समाप्त करण्यासाठी आवश्यक असलेल्या वीस साधनांचे, ''ज्ञान'' या सदराखाली पुढील पाच श्लोकांत वर्णन करत आहेत.*

**अमानित्वमदम्भित्वमहिंसा क्षान्तिरार्जवम्।**
**आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः॥ ७॥**

**अमानित्वम्** = आपल्यात श्रेष्ठतेचा भाव नसणे, **अदम्भित्वम्** = दिखावटीपणा नसणे, **अहिंसा** = अहिंसा, **क्षान्तिः** = क्षमा, **आर्जवम्** = सरळपणा, **आचार्योपासनम्** = गुरुसेवा, **शौचम्** = अंतर्बाह्य शुद्धी, **स्थैर्यम्** = स्थिरता (आणि) **आत्मविनिग्रहः** = मनावर ताबा असणे.

***व्याख्या*— अमानित्वम्—**आपल्यात मानीपणाचा अभाव असणे, याला ''अमानित्व'' म्हणतात. वर्ण, आश्रम, योग्यता, विद्या, गुण, पद इत्यादीच्या अनुषंगाने आपल्यात मोठेपणाचा भाव असतो की, ''मी मान्यवर आहे, आदरणीय

* ज्ञान कशाचेही दोषी नसते. जसे भोजन करतेवेळी जीभेला स्वादाचे ज्ञान होणे दोष नाही तर भोजनाच्या पदार्थाविषयी आसक्ती अथवा द्वेष होणे दोष आहे.

आहे'', परंतु हा भाव उत्पत्ति-विनाशशील शरीराशी तादात्म्य झाल्यानेच उत्पन्न होत असतो. म्हणून ह्याच्यात जडतेचीच मुख्यता राहत असते. हा मानीपणा राहण्याने साधकास वास्तविक ज्ञान प्राप्त होत नाही. हा मानीपणा साधकात जितका कमी राहील, तितकेच जडतेचे महत्त्व कमी होईल. जडतेचे जितके महत्त्व कमी होईल, जडतेच्या अनुषंगाने आपल्यात असलेल्या मानीपणाचाही तितकाच भाव कमी होईल आणि साधक तितक्याच वेगाने चिन्मयतेकडे वाटचाल करील.

**उपाय**—जेव्हा साधक स्वत: मोठा होतो, तेव्हा त्यात मानीपणा येत असतो. म्हणून साधकाने जे श्रेष्ठ पुरुष आहेत, साधनेत आपल्यापेक्षा वरिष्ठ आहेत, तत्त्वज्ञ (जीवन्मुक्त) आहेत, त्यांची संगती करावी, त्यांच्याजवळ निवास करावा, त्यांच्या अनुकूल होऊन जावे. असे केल्याने मानीपणा कमी होत जातो. इतकेच नव्हे, तर त्यांच्या संगतीने पुष्कळसे दोष सुगमतेने समाप्त होतात.

गोस्वामी तुलसीदासजी म्हणतात—''**सबहि मानप्रद आपु अमानि**'' (मानस ७।३८।२) अर्थात् संत सर्वांना मान देणारे आणि स्वत: अमानी—मान मिळविण्याविषयी इच्छा रहित असतात. त्याचप्रमाणे साधकांनीही मानीपणा समाप्त करण्यासाठी नेहमी दुसऱ्यांना मान, आदर, सत्कार, मोठेपणा इत्यादी देण्याचा स्वभाव बनविला पाहिजे. असा स्वभाव, जेव्हा तो दुसऱ्यांना कोण्या ना कोण्या दृष्टीने आपल्यापेक्षा श्रेष्ठ समजेल, तेव्हाच होऊ शकतो . प्रत्येक मनुष्य भिन्न भिन्न स्वभावाचा असला तरीही, कोणते ना कोणते वैशिष्ट्य त्याचे जवळ असतेच. हे वैशिष्ट्य वर्ण, आश्रम, गुण, विद्या, बुद्धी, योग्यता, पद, अधिकार इत्यादी कोणत्याही कारणाने असू शकते. म्हणून साधकाने दुसऱ्यांच्या विशेषतेकडे लक्ष ठेऊन त्यांचा नेहमी सन्मान करावा. अशा प्रकारे दुसऱ्यांना मान देण्याचा स्वभाव अंत:करणापासून झाल्यास, स्वत:ला मान मिळविण्याच्या इच्छेचा आपोआप अभाव होत जातो. मात्र दुसऱ्यांना मान देतेवेळी साधकाचा उद्देश आपल्यातला मानीपणा समाप्त करण्याचा असला पाहिजे, मोबदल्यात दुसऱ्याकडून मान मिळविण्याचा असता कामा नये.

## विशेष गोष्ट

गीतेत भगवंतांनी भक्तिमार्गाच्या साधकांमध्ये सर्वात प्रथम भयाचा अभाव सांगितला आहे—''**अभयम्**'' (१६।१) आणि शेवटी मानीपणाचा अभाव सांगितला आहे—''**नातिमानिता**'' (१६।३). परंतु ज्ञानमार्गाच्या साधकांमध्ये मानीपणाचा अभाव सर्वात प्रथम सांगितला आहे—''**अमानित्वम्**'' (१३।७) आणि भयाचा अभाव सर्वात शेवटी सांगितला आहे—''**तत्त्वज्ञानार्थदर्शनम्**'' (१३।११). याचे तात्पर्य, जसा बालक आपल्या आईला पाहताच अभय होत असतो, तसेच भक्तिमार्गामध्ये साधक प्रल्हादाप्रमाणे आरंभापासूनच सर्वत्र आपल्या प्रभूलाच पाहत असतो, म्हणून तो आरंभापासूनच अभय झालेला असतो. स्वत: अमानी राहून दुसऱ्यांना मान देण्याची सवय सुरवातीपासून-च भक्ताला राहत असते. शेवटी त्याचा देहाध्यास अर्थात् शरीराशी मानलेली एकता आपोआप समाप्त होते, तेव्हा तो सर्वथा अमानी होतो. परंतु ज्ञानमार्गाचा साधक आरंभापासून-च शरीराशी आपली एकता समजत नाही, (१३।१). म्हणून तो आरंभापासूनच अमानी होतो, कारण शरीराशी एकता मानल्यानेच मानीपणा येत असतो. शेवटी तत्त्वज्ञानाच्या फल-रूपी परमात्म्याला सर्वत्र (सर्व ठिकाणी) पाहून अभय होतो.

**अदम्भित्वम्**—दंभ म्हणजे ढोंगीपणा, दिखाऊपणा. लोक आपल्यात चांगले गुण पाहतील तर आपला मान करतील, हारतुरे घालतील, पूजा करतील, उच्चासन देतील, अशा इच्छेने आपल्यात तसे गुण नसतानाही, ते असल्याचे दाखविणे, कमी गुण असूनही बाहेरुन ते वाढवून जास्त दाखविणे—हा सर्व दंभ आहे.

आपल्यामध्ये सदाचार, शुद्धता, पवित्रता आहे, पण ती जर लोकांपुढे दाखविली तर लोक आपल्याला हसतील, निंदा करतील, या भीतीने आपली पवित्रता सोडून इतरां-प्रमाणे वागणेही दंभ आहे. जसे आजकाल विवाहाच्या वेळी, क्लब-हॉटेल येथील स्वागत समारोहात, अथवा विमानद्वारा परदेशगमन करतेवेळी, पवित्र आचरण करणारे सज्जनही, मान-सन्मानासाठी अपवित्र खाद्य पदार्थ ग्रहण करत असलेले दिसतात. हाही दंभच आहे. त्याचप्रमाणे दुराचारी पुरुषही चांगल्या लोकांच्या समुदायात आल्यास मान, कीर्ती, सत्कार, प्रतिष्ठा, इत्यादीच्या प्राप्तीच्या इच्छेने, आपल्याला बाहेरुन धर्मात्मा, भक्त, सेवक, दानी इत्यादी दाखविण्याचा प्रयत्न करतो. हाही दंभच आहे.

एखादा साधक एकांतात, बंद खोलीत बसून जप, ध्यान, चिंतन करत आहे आणि त्याबरोबर आळस, झोपही घेत आहे. परंतु जेव्हा त्याच्यावर श्रद्धा असलेल्या माणसाचा आवाज बाहेरुन येतो, तेव्हा तो आवाज ऐकताच सावध होऊन पुन्हा जप, ध्यान करू लागतो, त्यावेळी त्याचा आळस व झोप समाप्त होते, हाही एक सूक्ष्म दंभ आहे. यातही जर पाहू गेले तर, आवाज ऐकून सावध होणे हा दोष नाही, परंतु त्यात जो दिखावटीपणाचा भाव येत असतो की, ह्या मनुष्याने माझ्याविषयी अश्रद्धा करून घेऊ नये, असा भाव असणे दोष

आहे. अशा भावाऐवजी असा भाव उत्पन्न झाला पाहिजे की, भगवंतांनी फार चांगले केले आणि मला सावधान करून जप-ध्यानात प्रवृत्त केले. या सर्व प्रकारच्या दंभाचा अभाव होणे ''अदंभित्व'' आहे.

**उपाय**—साधकाने आपला उद्देश एकमात्र परमात्मप्राप्तीचाच ठेवला पाहिजे, लोकांना दाखविण्याचा उद्देश किंचिन्मात्रही नसावा. जर त्यामध्ये दिखाऊपणा आला तर त्याच्या साधनेत शिथिलता येईल, ज्यामुळे उद्देशाच्या सिद्धीत बाधा येईल. म्हणून त्याला कोणी चांगले, वाईट, श्रेष्ठ, कनिष्ठ काहीही समजो, त्याने त्याकडे लक्ष न देता, आपल्या साधनेत लागून रहावे. अशी सावधगिरी बाळगल्यास दंभ समाप्त होतो.

**अहिंसा**—मन, वाणी आणि शरीराने कधीही कुणाला किंचिन्मात्रही दु:ख न देणे, ''अहिंसा'' आहे. कर्ता भेदाने हिंसा तीन प्रकारची होत असते. कृत (स्वत: हिंसा करणे), कारित (कुणाकडून हिंसा करविणे) आणि अनुमोदित (हिंसेविषयी अनुमोदन-समर्थन करणे).

उपर्युक्त तीन प्रकारची हिंसा तीन भावाने होत असते—क्रोधाने, लोभाने, मोहाने. तात्पर्य, क्रोधानेही कृत, कारित आणि अनुमोदित हिंसा होत असते, लोभानेही कृत, कारित आणि अनुमोदित हिंसा होत असते, तसेच मोहानेही कृत, कारित आणि अनुमोदित हिंसा होत असते. अशा प्रकारे हिंसा नऊ प्रकाराने होत असते.

उपर्युक्त नऊ प्रकारच्या हिंसेमध्ये तीन मात्रा असतात. मृदुमात्रा, मध्यमात्रा, अधिमात्रा. कुणाला थोडे दु:ख देणे मृदु-मात्रेत हिंसा आहे, मृदुमात्रेपेक्षा अधिक दु:ख देणे, मध्यमात्रेत हिंसा आहे आणि फार मोठे घायाळ करणे अथवा हत्या करणे अधिमात्रेत हिंसा आहे. अशा प्रकारे मृदू, मध्य आणि अधिमात्रेच्या भेदाने हिंसा सत्तावीस प्रकारची होते.

उपर्युक्त सत्तावीस प्रकारची हिंसा तीन करणांनी होत असते—शरीराने, मनाने आणि वाणीने. अशा प्रकारे हिंसा एक्याऐंशी प्रकारची होते. यापैकी कोणत्याही प्रकारची हिंसा न करणे ''अहिंसा'' आहे.

अहिंसा देखील चार प्रकारची होत असते. देशगत, काळगत, वेळगत, व्यक्तिगत. अमुक तीर्थात अमुक मंदिरात, अमुक स्थानात कोणाला दु:ख न देणे ही हिंसा ''देशगत अहिंसा'' आहे. अमावस्या, पौर्णिमा, व्यतिपात इत्यादी पर्वाच्या दिवशी कुणाला दु:ख न देणे ''कालगत अहिंसा'' आहे. संत भेटीत, पुत्र जन्मदिवस, पितृनिधन इत्यादी समयी कुणाला दु:ख न देणे ''समयगत अहिंसा'' आहे. गाय, हरिण, इत्यादीना तसेच गुरुजन, माता-पिता, बालक इत्यादींना दु:ख न देणे—''व्यक्तिगत अहिंसा'' आहे.

कोणत्याही देश, काळ, इत्यादीत, क्रोध, लोभ, मोह-पूर्वक, कुणालाही शरीर, वाणी आणि मनाने, कोणत्याही प्रकाराने दु:ख न देण्याने, ही सार्वभौम अहिंसा ''महाव्रत'' म्हणविली जाते.

**उपाय**—जसे साधारण प्राणी आपल्या शरीर सुखाची इच्छा करतो, तसेच साधकाने सर्वांच्या सुखात आपले सुख, सर्वांच्या हितात आपले हित आणि सर्वांच्या सेवेत आपली सेवा समजली पाहिजे अर्थात् सर्वांच्या सुख, हित आणि सेवेहून आपले सुख, हित आणि सेवा वेगळी समजता कामा नये. ''सर्व आपलेच स्वरूप आहे'' असा विवेक जागृत राहिल्यास, त्याच्याकडून कुणाला दु:ख देण्याची क्रिया होणारच नाही आणि त्यात अहिंसा भाव आपोआप येईल.

**क्षान्तिः**—क्षमा, सहनशीलता म्हणजे क्षान्ती. आपल्यात सामर्थ्य असतानाही अपराध करणाऱ्याला कधीही कोणतीही किंचिन्मात्रही शिक्षा होऊ नये असा भाव ठेवणे, तसेच त्याचा बदला घेणे, अथवा दुसऱ्याकडून त्याला शिक्षा करविण्याचा भाव न ठेवणेहीच ''क्षान्ती'' आहे.

**उपाय-(१)** सहनशीलता आपल्या स्वरूपात स्वत:-सिद्ध आहे, कारण आपल्या स्वरूपात कधी विकृती येतच नाही. म्हणून कधी ''अमुकाने दु:ख दिले आहे, अपराध केला आहे'', अशी एखादी वृत्ती जरी उत्पन्न झाली तरी, त्यावेळी हा विचार सहज आला पाहिजे की, आपले कुणी काहीही बिघडवू शकत नाही, आपल्यात कोणतीही विकृती येऊ शकत नाही, ती आपल्या स्वरूपापर्यंत पोहचू शकत नाही. असा विवेक झाल्यास क्षमाभाव आपोआप उद्भवतो.

(२) जसे भोजन करतेवेळी आपल्याच दाताने आपली जीभ चावली गेली, तर आपण दातावर क्रोध करत नाही, दातांना शिक्षा करत नाही. मात्र जीभ बरी व्हावी ही गोष्ट मनात येईल, परंतु दातांना पाडून टाकावे, असा भाव कधी मनात येतच नाही. कारण दातांना पाडून टाकले तर एक नवीन आपत्ती ओढवेल, अर्थात् दु:ख द्विगुणीत वाढेल, ज्यामुळे आपल्यालाच दु:ख होईल, आपलेच अनिष्ट होईल. त्याचप्रमाणे विनाकारण कोणी आपला अपराध केला, आपल्याला दु:ख दिले, त्याला जर आपण शिक्षा केली, दु:ख दिले तर, वास्तविक आपलेच अनिष्ट होईल, कारण तेही तर आपलेच स्वरूप आहे. (६।२९)

**आर्जवम्**—सरळ-साधेपणाचा जो भाव असतो त्याला आर्जव म्हणतात. साधकाच्या शरीर, मन आणि वाणीत

सरळ-साधेपणा असला पाहिजे. शरीराच्या सजावटीचा भाव नसणे, राहणीमान साधे असणे, वागणूक-आचरण यात स्वाभाविक सरळपणा असणे, ताठरपणा नसणे—ही "शरीराची सरळता" आहे. छळ, कपट, ईर्ष्या, द्वेष इत्यादीचे नसणे तसेच निष्कपटता, सौम्यता, हितैषिता, दया इत्यादीचे होणे ही "मनाची सरळता" आहे. व्यंग, निंदा, चुगली-चहाडी इत्यादी न करणे, बोचणारे तसेच अपमान-जनक वचन न बोलणे, तसेच सरळ, प्रिय आणि हितकारक वचन बोलणे ही "वाणीची सरळता" आहे.

**उपाय**—आपल्याला एका देशात मानल्याने अर्थात् स्थूल, सूक्ष्म आणि कारण—शरीराशी संबंध ठेवल्याने आपल्यात दुसऱ्यापेक्षा काही विशेषता दिसते. यामुळे व्यवहारातही चालता-फिरताना, उठता-बसताना इत्यादी क्रिया करताना काही ताठरपणा, अहंभाव उद्भवतो. म्हणून शरीराशी आपला संबंध न मानल्याने आणि आपल्या स्वरूपाकडे दृष्टी राहण्याने हा ताठरपणा समाप्त होतो आणि साधकात आपोआप सरळता, नम्रता प्रगट होते.

**आचार्योपासनम्**—विद्या आणि सदुपदेश देणाऱ्या गुरूंनाही आचार्य म्हणतात आणि त्यांच्या सेवेनेही लाभ होतो; परंतु येथे "आचार्य" पद परमात्मतत्त्व प्राप्त झालेल्या जीवन्मुक्त महापुरुषाचेच वाचक आहे. आचार्यांना दंडवत प्रणाम करणे, त्यांचा आदर-सत्कार करणे आणि त्यांच्या शरीराला सुख पोहचविण्याचा शास्त्रविहित प्रयत्न करणे ही त्यांची उपासना आहे, परंतु वास्तविक त्यांच्या सिद्धांत आणि भावानुसार आपले जीवन घडविणे हीच त्यांची खरी उपासना आहे. कारण देहाभिमान्याची सेवा तर त्याच्या शरीराची सेवा करण्यानेच होते, परंतु गुणातीत महापुरुषांच्या केवळ देहाची सेवा करणे त्यांची पूर्ण सेवा नव्हे.

भगवंतांनी दैवी संपत्तीच्या लक्षणांत "**आचार्योपासनम्**" पद न देता, येथे ज्ञानाच्या साधनेत त्याला दिले आहे. यात एक विशेष रहस्य प्रगट होते की, ज्ञानमार्गात गुरूंची जितकी आवश्यकता आहे, तितकी आवश्यकता भक्तिमार्गात नाही. कारण भक्तिमार्गात साधक सर्वथा भगवंताच्या आश्रित राहूनच साधन करत असतो, म्हणून भगवान् स्वत: त्याचेवर कृपा करून त्याच्या योगक्षेमाचे वहन करतात. (९।२२), त्याच्या उणीवेला, विघ्न-बाधांना समाप्त करून टाकतात. (१८।५८) आणि त्याला तत्त्वज्ञानाची प्राप्ती करवितात. (१०।११) परंतु ज्ञानमार्गात साधक आपल्या साधनेच्या बळावर मार्गक्रमण करतो, म्हणून त्याच्यात काही सूक्ष्म उणीवा राहू शकतात—जसे—

(१) शास्त्र आणि संतांकडून ज्ञान प्राप्त करून जेव्हा साधक शरीराला (आपल्या धारणेने) आपल्यापासून वेगळे समजतो, तेव्हा त्याला शांती मिळत असते. अशा स्थितीत तो हे समजतो की, मला तत्त्वज्ञान प्राप्त झाले. परंतु जेव्हा मान-अपमानाचा प्रसंग येतो, अथवा आपल्या इच्छेनुकूल अथवा प्रतिकूल घटना घडतात, तेव्हा अंत:करणात हर्ष-शोक उत्पन्न होतात, ज्यावरुन सिद्ध होते की, अजून तत्त्व-ज्ञान झाले नाही.

(२) एखाद्या मनुष्याकडून अचानक आपले नाव ऐकण्यात आले तर अंत:करणात "ह्या नावाचे शरीर मी आहे" असा भाव उत्पन्न होतो, तर समजून घ्यावे की, अजून माझी शरीरातच स्थिती आहे.

(३) साधनेची उच्च स्थिती प्राप्त झाली असता जागृत अवस्थेत तर जड-चेतनाचा विवेक उत्तम प्रकारे राहतो, परंतु निद्रावस्थेत त्याची विस्मृती होत असते. म्हणून झोपेतून जागे झाल्यावर साधक त्या विवेकाला पकडतो, परंतु सिद्ध महापुरुषांचा विवेक स्वाभाविकरूपाने राहत असतो.

(४) साधकात पूज्य व्यक्तीकडूनही मान-सन्मान व्हावा अशी इच्छा असते. जसे जेव्हा तो संत अथवा गुरुजनांची सेवा करत असतो, सत्संग इत्यादीत मुख्यत्वाने भाग घेत असतो, तेव्हा त्याच्या अंत:करणात असा भाव उत्पन्न होतो की, त्या संत अथवा गुरुजनांनी मला दुसऱ्यापेक्षा श्रेष्ठ समजावे. ही त्याची सूक्ष्म उणीवच आहे.

अशा प्रकारे साधकात कित्येक उणीवा राहण्याची शक्यता असते, ज्याकडे लक्ष न राहिल्याने तो आपल्या अर्धवट ज्ञानालाच पूर्ण समजू शकतो. म्हणून भगवान् "**आचार्योपासनम्**" पदाने हे सांगत आहेत की, ज्ञानमार्गाच्या साधकाने आचार्यांजवळ राहून त्यांच्या अधीनतेतच साधन केले पाहिजे. चौथ्या अध्यायाच्या चौतीसाव्या श्लोकातही भगवंतांनी अर्जुनाला म्हटले आहे की, "तू तत्त्वज्ञ जीवन्मुक्त महापुरुषांजवळ जा, त्यांना दण्डवत्-प्रणाम कर, त्यांची सेवा कर आणि आपल्या जिज्ञासापूर्तीसाठी नम्रतापूर्वक प्रश्न कर, तेव्हा ते तत्त्वदर्शी ज्ञानी महात्मा तुला ज्ञानाचा उपदेश करतील". अशा प्रकारे साधन केल्यास ते महापुरुष त्याच्या त्या सूक्ष्म उणीवांना, ज्यांना तो स्वत: ही जाणत नाही, समाप्त करून त्याला सुगमतेने परमात्मतत्त्वाचा अनुभव करून देऊ शकतात.

साधकाने सुरवातीलाच विवेक धारण करून आचार्य, संत-महापुरुषांजवळ गेले पाहिजे. आचार्य (गुरू) कसे असावे ? या संबंधात ह्या गोष्टी लक्षात ठेवल्या पाहिजेत.

(१) आपल्या दृष्टीने ते वास्तविक बोध प्राप्त झालेले तत्त्वज्ञ दिसत असावेत.

(२) ते कर्मयोग, ज्ञानयोग, भक्तियोग इत्यादी साधनांना योग्य प्रकारे जाणणारे असावेत.

(३) त्यांच्या संगतीने, वचनाने आपल्या अंत:करणात असलेल्या शंका न विचारताही आपोआप नाहीशा व्हाव्यात.

(४) त्यांच्याजवळ राहिल्याने प्रसन्नता, शांतीचा अनुभव यावा.

(५) ते आपल्याशी केवळ आपल्या हितासाठीच संबंध ठेवत असलेले दिसावेत.

(६) जे आपल्याकडून कोणत्याही वस्तूची किंचिन्मात्रही आशा ठेवत नसावेत.

(७) त्यांच्या संपूर्ण क्रिया साधकांच्या हितासाठीच होत असाव्यात.

(८) त्यांच्याजवळ राहिल्याने उद्देशाकडे आमची तीव्रता स्वाभाविक वाढत असावी.

(९) त्यांची संगती, दर्शन, भाषण, स्मरण इत्यादीने आपले दुर्गुण-दुराचार समाप्त होऊन आपोआप सद्गुण-सदाचाररूपी दैवी संपत्ती आपल्यात बाणावी.

(१०) त्यांच्याशिवाय दुसऱ्या कोणातही तशी अलौकिकता, विलक्षणता दिसत नसावी.

अशा आचार्य, संतांजवळ राहिले पाहिजे आणि आपल्या केवळ उद्धारासाठीच त्यांच्याशी संबंध ठेवला पाहिजे. ते काय करतात, काय करत नाहीत ? ते अशी क्रिया का करतात ? ते केव्हा कोणाशी कसे वर्तन करतात ? इत्यादी विषयी आपली बुद्धी चालवू नये अर्थात् त्यांच्या क्रियेविषयी तर्क केला जाऊ नये. साधकाने तर त्यांच्या अधीन होऊन राहिले पाहिजे, त्यांची आज्ञा, मर्जीनुसार सर्व क्रिया केल्या पाहिजेत आणि श्रद्धा भावपूर्वक त्यांची सेवा केली पाहिजे. जर ते महापुरुष इच्छित नसतील तर त्यांचेशी गुरु-शिष्याचा व्यावहारिक संबंधही जोडण्याची आवश्यकता नाही. मात्र, त्यांना अंत:करणातून गुरू समजून त्यांचेविषयी श्रद्धा ठेवल्याने कोणतीही आपत्ती येत नाही.

जर असे महापुरुष मिळाले नाही तर साधकाने केवळ परमात्मपरायण होऊन त्यांचे ध्यान, चिंतन इत्यादीत लागून रहावे आणि विश्वास ठेवावा की, परमात्मा अवश्य गुरूंची प्राप्ती करवतील. वास्तविक पाहिले तर, परमात्म्यावर पूर्णपणे निर्भर झाल्याने गुरूंचे काम परमात्माच पूर्ण करतात, कारण गुरूंकडूनही वास्तविक परमात्माच साधकाला मार्गदर्शन करत असतात.

**उपाय**—ज्या साधकाचा परमात्मप्राप्तीचाच उद्देश आहे, त्याचा असा भाव राहिला पाहिजे की, आजपर्यंत जे काही ज्या कोणाला मिळाले आहे, ते गुरूंच्या, संतांच्या सेवेने, त्यांच्या प्रसन्नतेने, त्यांच्या अनुकूल वर्तन करण्यानेच मिळाले आहे.* म्हणून मलाही शुद्ध अंत:करणाने संतांची सेवा करावयाची आहे.

### विशेष गोष्ट

गुरूंची सेवा करणे शिष्याचे कर्तव्य आहे. जर शिष्याने आपल्या कर्तव्याचे तत्परतेने पालन केले तर, त्याचा संसाराशी संबंध-विच्छेद होतो आणि तो गुरुतत्त्वाशी ऐक्य पावतो. अर्थात् त्याच्यात गुरुत्व प्रकट होते. संसाराशी संबंध-विच्छेद झाल्यास मुक्ती आणि गुरुतत्त्वाशी ऐक्य पावल्याने भक्ती प्राप्त होते. शिष्यात गुरुत्व आल्याने त्याच्यात शिष्यत्व राहत नाही. त्याच्यावर शास्त्राचे शासन चालत नाही. जर शिष्याने आपल्या कर्तव्याचे पालन केले नाही तर, त्याचे नाव तर शिष्य राहील, परंतु त्याच्यात शिष्यत्व राहणार नाही. शिष्यत्व न राहिल्याने त्याचा संसाराशी संबंध-विच्छेद होणार नाही आणि त्याच्यात गुरुत्वही येणार नाही. म्हणून त्याच्यात संसाराचे दास्यत्व राहील.

गुरूंने केवळ माझे कल्याण करावे—असा भाव ठेवणे सुद्धा शिष्यासाठी बंधन आहे. शिष्याने आपल्यासाठी कशाचीही इच्छा करू नये आणि संपूर्णपणे गुरूंला समर्पित होऊन जावे, त्यांच्या मर्जीत आपली मर्जी मिसळून टाकावी.

शिष्याचे कल्याण करणे, गुरूंचे कर्तव्य आहे. जर गुरूंनी आपल्या कर्तव्याचे पालन केले नाही तर, त्यांचे नाव तर गुरू राहील, परंतु त्याच्यात गुरुत्व राहणार नाही. गुरुत्व न राहिल्याने त्यांच्यात शिष्याचे दास्यत्व राहील. जोपर्यंत गुरू शिष्याकडून काही तरी (धन, मान, मोठेपणा इत्यादी) इच्छित असेल, तोपर्यंत त्याच्यात गुरूत्व न राहता शिष्याचे दास्यत्व राहत असते.

**शौचम्**—अंतर्बाह्य शुद्धीचे नाव शौच आहे. पाणी, माती इत्यादीने शरीराची शुद्धी होत असते आणि दया, क्षमा, उदारता इत्यादीने अंत:करणाची शुद्धी होत असते.

**उपाय**—शरीर अशा पदार्थांनी बनलेले आहे की, याला कितीही शुद्ध करीत राहिले तरी हे अशुद्धच राहत असते. यापासून वारंवार अशुद्धीच निघत असते. म्हणून

---

* या विषयात कोणी एकाने म्हटले आहे—

न कुछ हम हँसके सीखे हैं, न कुछ हम रोके सीखे है। जो कुछ थोडा-सा सीखे हैं किसीके होके सीखे है।

याला वारंवार शुद्ध करता-करताच, याच्या वास्तविक अशुद्धीचे ज्ञान होते, ज्यामुळे शरीराविषयी अरुची (उपरमता) होते.

वर्ण, आश्रम इत्यादीनुसार सत्य व्यवसायाने धन मिळविणे, असत्य कपट इत्यादी न करणे, दुसऱ्याच्या हक्काची पायमल्ली न करणे, खाण्या पिण्यात पवित्र वस्तूंचा वापर करणे, इत्यादीने अंत:करणाची शुद्धी होते.

**स्थैर्यम्**—स्थैर्य म्हणजे स्थिरता, विचलित न होणे. जो विचार केला असेल, जो उद्देश ठरवला असेल, त्यापासून विचलित न होणे ''स्थैर्य'' आहे. मला तत्त्वज्ञान प्राप्त करावयाचेच आहे—असा दृढ निश्चय करणे आणि विघ्न, बाधा आले तरी त्यापासून विचलित न होता, आपल्या निश्चयानुसार साधनेत तत्परतेने व्यस्त राहणे, यालाच येथे ''**स्थैर्यम्**'' पदाने म्हटले गेले आहे.

**उपाय**—( १ ) सांसारिक भोग आणि संग्रहात आसक्त असलेल्या पुरुषांची बुद्धी एका निश्चयावर दृढ राहत नाही. (२।४४) म्हणून साधकाने भोग आणि संग्रहाच्या आसक्तीचा त्याग केला पाहिजे.

(२) साधकाने जर एखादे अगदी साधारण कार्य करण्याचे ठरविले असेल, तर ते कार्य अर्धवट सोडू नये अर्थात् त्यावर स्थिरतेने दृढ रहावे. असे केल्याने त्याचा स्वभाव स्थिर राहण्याचा बनून जाईल.

(३) साधकाचा संत आणि शास्त्र यांच्या वचनावर जितका विश्वास अधिक राहील, तितकीच त्याच्यात स्थिरता येईल.

**आत्मविनिग्रह:**—या ठिकाणी आत्मा मनाला म्हटले आहे आणि त्याला वश करणे ''आत्मविनिग्रह'' आहे. मनात दोन प्रकारच्या भावना उत्पन्न होतात—स्फुरणा आणि संकल्प. स्फुरणा कित्येक प्रकारची असते आणि ती येत-जात राहते. परंतु ज्या स्फुरणेत मन चिकटते, ज्याला मन पकडून ठेवते तो ''संकल्प'' बनतो. संकल्पात दोन गोष्टी राहत असतात. राग आणि द्वेष. या दोन्हीविषयी मनात चिंतन होत राहते. स्फुरणा तर आरशाच्या दृश्याप्रमाणे असते. दर्पणात दृश्य दिसत तर असते, परंतु कोणतेही दृश्य चिकटून राहत नाही अर्थात् दर्पण कोणत्याही दृश्याला पकडून ठेवत नाही. परंतु संकल्प कॅमेराच्या फिल्मसारखा असतो, जो दृश्याला पकडत असतो. अभ्यासाने, अर्थात् मनाला वारंवार ध्येयाकडे प्रवृत्त केल्याने स्फुरणा नष्ट होतात आणि वैराग्याने अर्थात् कोणत्याही वस्तू, व्यक्ती, पदार्थ, इत्यादीविषयी राग, महत्त्व न राहिल्याने संकल्प नष्ट होतात. अशा प्रकारे अभ्यास आणि वैराग्याने मन वश होते (६।३५)

**उपाय**—(मनाला वश करण्याचे उपाय सहाव्या अध्यायाच्या सव्वीसाव्या श्लोकाच्या व्याख्येत पाहून घ्यावेत)

**परिशिष्ट भाव**—भगवान् क्षेत्राशी मानलेल्या संबंधाला (तादात्म्याला) तोडण्यासाठी ज्ञानाच्या साधना सांगतात. ह्या साधना तादात्म्य तोडण्यात सहायक आहेत.

## इन्द्रियार्थेषु वैराग्यमनहङ्कार एव च।
## जन्ममृत्युजराव्याधिदु:खदोषानुदर्शनम् ॥८॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **इन्द्रियार्थेषु** | = इंद्रियांच्या विषयांत | **च** | = आणि | **दु:खदोषानु-** | = तसेच व्याधींत |
| **वैराग्यम्** | = वैराग्य उत्पन्न होणे, | **जन्ममृत्यु-** | = जन्म, मृत्यू, | **दर्शनम्** | दु:खरूपी दोषांना |
| **अनहङ्कार:, एव** | = अहंकारही नसणे | **जराव्याधि-** | वृद्धावस्था | | वारंवार पाहणे. |

***व्याख्या***—**इन्द्रियार्थेषु वैराग्यम्**—इह-परलोकाच्या शब्दादी सर्व विषयात इंद्रियांचे आकर्षण न होणे हेच इद्रियांच्या विषयात आसक्तिरहित होणे आहे. इंद्रियांचा विषयाशी संबंध झाल्यावरही, तसेच शास्त्रानुसार जीवन-निर्वाहासाठी इंद्रियांकडून विषयांचे सेवन करत असूनसुद्धा साधकाला विषयात राग, आसक्ती, प्रियता नसावी.

**उपाय**—(१) विषयात आसक्ती असल्यानेच विषयाची महत्ता दिसते, संसारात आकर्षण असते आणि यामुळेच सर्व पाप होत असते. जर आपली विषयात आसक्ती असेल तर तत्त्वबोध कसा होईल? परमात्मतत्त्वात आपली स्थिती कशी होईल? जर आसक्तीचा त्याग झाला तर, परमात्म्यात स्थिती होऊ शकेल, असा विवेक जागृत झाल्यास विषयांपासून वैराग्य होते.

(२) माठेमोठे धनी, शूरवीर, राजे महाराजे झाले आणि त्यांनी पुष्कळ भोग भोगले परंतु शेवटी त्यांचे काय राहिले ? काही राहिले नाही. त्यांचे शरीर कमजोर झाले आणि शेवटी ते मृत्युमुखी पडले. अशा प्रकारे विवेक जागृत झाल्यास वैराग्य होते.

(३) ज्यांनी भोग भोगले नाहीत, ज्यांच्याजवळ भोग सामुग्री नाही, जे संसारापासून विरक्त आहेत, त्यांच्यापेक्षा ज्यांनी पुष्कळ भोग भोगले आहेत आणि भोग भोगत आहेत, त्यांच्यात कोणती विलक्षणता, विशेषता आली ? काही नाही.

उलट भोग भोगणारे तर शोक-चिंतेत बुडाले आहेत. असा विवेक झाला तरी वैराग्य होते.

**अनहङ्कार एव च**—प्रत्येक व्यक्तीच्या अनुभवात "मी आहे" अशा प्रकारची एक वृत्ती असते. ही वृत्तीच शरीराशी मिसळून "मी शरीर आहे", अशा प्रकारे एकदेशीयता अर्थात् अहंकार उत्पन्न करत असते. त्यामुळेच शरीर, नाव, क्रिया, पदार्थ, भाव, ज्ञान, त्याग, देश, काळ, इत्यादीशी आपला संबंध मानून जीव उच्च-नीच योनीत जन्मत-मरत राहतो (१३।२१). हा अहंकार साधनेत बहुधा फार दीर्घकाळ पर्यंत राहतो. वास्तविक याची सत्ता नाही, तरीपण स्व ची मान्यता असल्याकारणाने व्यक्तित्वाच्या रूपात याचे भान होत राहते. भगवंताकडून ज्ञानाच्या साधनेत या पदाचा प्रयोग केला जाण्याचे तात्पर्य, शरीराविषयी मानलेल्या अहंकाराचा संपूर्णपणे अभाव करण्यात आहे. कारण जड-चेतनाचा यथार्थ बोध झाल्यावर, याचा सर्वथा अभाव होतो. मनुष्यमात्र अहंकार-रहित होऊ शकतो, म्हणूनच भगवान् येथे "**अनहङ्कारः**" पदाने अहंकाराचा त्याग करण्यासाठी सांगत आहेत.

अभिमान आणि अहंकाराचा प्रयोग एकाच वेळी झाल्यावर त्यापासून वेगवेगळ्या भावांचा बोध होत असतो. सांसारिक पदार्थाच्या संबंधाने अभिमान उत्पन्न होतो. त्याचप्रमाणे त्याग, वैराग्य, विद्या इत्यादीच्या अनुषंगाने आपल्यात विशेषता दिसल्यानेसुद्धा अभिमान उत्पन्न होतो. शरीरालाच आपले स्वरूप समजल्याने अहंकार उत्पन्न होतो. येथे "**अनहङ्कारः**" पदाने अभिमान आणि अहंकार दोन्हींच्या सर्वथा अभावाचा अर्थ घेतला पाहिजे.

मनुष्याला झोपेतून जागे झाल्यावर सर्वात प्रथम "अहम्" अर्थात् "मी आहे" या वृत्तीचे ज्ञान होते. नंतर मी अमुक शरीर, नाव, जाती, वर्ण, आश्रम इत्यादींचा आहे—असा अभिमान होतो. हा एक क्रम आहे. त्याचप्रमाणे पारमार्थिक मार्गातसुद्धा अहंकाराच्या नाशाचा एक क्रम आहे. सर्वात प्रथम स्थूल शरीराशी संबंधित असलेल्या धनादी पदार्थाचा अभिमान समाप्त होतो. मग कर्मेंद्रियांच्या संबंधाने असणाऱ्या कर्तृत्वाभिमानाचा नाश होतो. त्यानंतर बुद्धीच्या प्रधानतेने राहणाऱ्या ज्ञातेपणाचा अहंकार समाप्त होतो. शेवटी "अहम्" वृत्तीच्या प्रधानतेने जो साक्षीपणाचा अहंकार आहे, तोही समाप्त होतो. त्यावेळी सर्वत्र परिपूर्ण असलेले सच्चिदानन्दघन स्वरूप स्वतः शिल्लक राहते.

**उपाय—(१)** आपल्यात श्रेष्ठतेच्या भावनेनेच अभिमान उत्पन्न होतो. जेव्हा मनुष्य दुसऱ्याकडे पाहून तो माझ्यापेक्षा तुच्छ आहे, असा विचार करतो, त्यावेळीच त्याला अभिमान उत्पन्न होतो. जसे संपूर्ण गावात एखादाच लखपती असला, तर त्याला दुसऱ्याकडे पाहून लखपती असण्याचा अभिमान उत्पन्न होतो. परंतु जर दुसरे सर्व करोडपती असतील, तर त्याला आपल्या लखपती असण्याचा अभिमान येत नाही. म्हणून अभिमानरूपी दोषाला समाप्त करण्यासाठी साधकाने दुसऱ्याच्या उणीवेकडे कधीही पाहू नये, उलट आपल्या उणीवांचा विचार करून त्या समाप्त करण्याचा प्रयत्न करावा.*

(२) एकच आत्मा जसा या शरीरात व्यापलेला आहे, तसेच तो अन्य शरीरांतही व्यापलेला आहे—"**सर्वगतः**" (२।२४) परंतु मनुष्य अज्ञानाने सर्वव्यापी आत्म्याला एका आपल्या शरीरातच सीमित मानून शरीराला "मी" मानतो. जसे मनुष्य बँकेत असलेल्या कोट्यावधी रुपयांपैकी केवळ आपल्याकडून जमा झालेल्या रुपयाविषयीच ममता करून, त्याच्याशी आपला संबंध मानून आपल्याला धनवान् मानतो, त्याचप्रमाणे एका शरीरात "मी शरीर आहे" अशी अहंता करून आणि काळाशी संबंध मानून "मी या वेळेत आहे", देशाशी संबंध मानून "मी येथे आहे", बुद्धीशी संबंध मानून "मी समजदार आहे", वाणीशी संबंध मानून "मी वक्ता आहे" इत्यादी अहंकार करून घेतो. अशा प्रकारचे संबंध न मानणे हाच अहंकाररहित होण्याचा उपाय आहे.

(३) शास्त्रांत परमात्म्याचे "सच्चिदानन्दघन" रूपाने वर्णन आले आहे. "सत्" (सत्ता) "चित्" (ज्ञान) आणि "आनन्द" (अविनाशी सुख) हे तिन्ही परमात्म्याची वेगवेगळी स्वरूपे नव्हेत,उलट एकाच परमात्मतत्त्वाची तीन नावे आहेत. म्हणून साधक यापैकी कोणत्याही एका विशेषणाने परमात्म्याचे लक्ष्य करून निर्विकल्प †होऊ शकतो. निर्विकल्प झाल्याने त्याला परमात्मतत्त्वामध्ये आपल्या स्वतः सिद्धीचा अनुभव होतो आणि अहंकाराचा सर्वथा नाश होतो. याला खालील प्रमाणे समजून घ्यावे.

**(क) "सत्"** परमात्मतत्त्व नेहमीच होते, आहे व राहील. ते कधी कमी-जास्त होत नाही, त्याचा कधी उत्पत्ति-विनाश होत नाही, सदा जसेच्या तसे राहते—असा

* तेरे भावे जो करे, भलौ बुरौ संसार। "नारायण" तू बैठिके, अपनौ भवन बुहार॥

† संसाराच्या चिंतनाने साधकाला काही उपयोग होत नाही आणि अचिन्त्य परमात्मतत्त्व चिंतनात येत नाही—हीच निर्विकल्पता आहे.

बुद्धीद्वारा विचार करून निर्विकल्प होऊन स्थिर झाल्यास, साधकाचा बुद्धीशी संबंध-विच्छेद होतो आणि त्या सत्-तत्त्वात आपल्या वास्तविक स्थितीचा अनुभव होतो. असा अनुभव झाल्यावर मग अहंकार राहत नाही.

**( ख ) चित्—**जसे प्रत्येक व्यक्तीचे शरीरादी दृश्य पदार्थ "अहम्" च्या अंतर्गत दृश्य आहेत, तसेच "अहम्" सुद्धा (मी, तू, हा आणि तो यारूपात) एका ज्ञानान्तर्गत दृश्य आहे.* त्या ज्ञानात (चेतन) निर्विकल्प होऊन स्थिर झाल्यास परमात्मतत्त्वामध्ये स्वत:सिद्धीचा अनुभव होतो. मग अहंकार राहत नाही.

**( ग ) आनन्द—**साधकलोक बहुतेक बुद्धी आणि अहम्‌ला प्रकाशित करणाऱ्या चेतनालाही बुद्धीद्वाराच जाणण्याचा प्रयत्न करत असतात. वास्तविक बुद्धीने जाणलेल्या अर्थात् शिकलेल्या विषयाला "ज्ञाना" ची संज्ञा देणे आणि त्यामुळे आपल्या स्वत:ला ज्ञानी मानून घेणे अज्ञानच आहे. बुद्धीला प्रकाशित करणारे तत्त्व बुद्धीद्वारा कसे जाणले जाऊ शकते? जरी साधकाजवळ, ज्याच्याकडून ते तत्त्व जाणू शकेल असे बुद्धीशिवाय दुसरे आणखी कोणतेही साधन नाही, तरीपण बुद्धीद्वारा केवळ जड संसाराच्या वास्तविकतेला जाणले जाऊ शकते. बुद्धी ज्याच्याकडून प्रकाशित होते, त्या तत्त्वाला बुद्धी जाणू शकत नाही. त्या तत्त्वाला जाणून घेण्यासाठी बुद्धीशीही संबंध-विच्छेद करणे आवश्यक आहे. बुद्धीला प्रकाशित करणाऱ्या परमात्मतत्त्वात निर्विकल्परूपाने स्थित झाल्यास, बुद्धीशी सर्वथा संबंध-विच्छेद होतो. मग एक "आनन्द" स्वरूप (ज्यात दु:खाचा लेशही नसतो) परमात्मतत्त्वच शिल्लक राहते, जे स्वत: ज्ञानस्वरूप आणि सत्स्वरूपही असते. अशा प्रकारे तत्त्वामध्ये निर्विकल्प (चूप) झाल्यास आनन्दच आनन्द आहे—असा अनुभव होतो. असा अनुभव झाल्याने अहंकार राहत नाही.

**जन्ममृत्युजराव्याधिदु:खदोषानुदर्शनम्—**जन्म, मृत्यू, वृद्धावस्था आणि रोगांच्या दु:खरूपी दोषांना वारंवार पाहण्याचे तात्पर्य खालील प्रमाणे आहे—

**( १ ) जन्म दु:ख—**जसे आव्यामध्ये (भट्टीत) मातीचे मडके भाजले जाते, तसेच जन्मापूर्वी बाळ मातेच्या उदरात जठराग्नीने शिजत राहते. मातेने खाल्लेल्या मीठ, तिखट इत्यादी क्षार आणि तीक्ष्ण पदार्थांनी त्याच्या शरीरास वेदना होतात. गर्भाशयातील सूक्ष्म जंतूसुद्धा त्याला चावत राहतात. प्रसूतीच्या वेळी मातेला जे कष्ट होतात त्याची कल्पनाही केली जाऊ शकत नाही. तसेच कष्ट बाळाला उदरातून बाहेर येताना होत असतात. अशा प्रकारे जन्माच्या दु:खरूप दोषांचा वारंवार विचार करून, यात केवळ दु:खच दु:ख आहे, हे दृढतेने जाणून घ्यावे.

**( २ ) मृत्यू दु:ख—**जो जन्मतो त्याला मरावेच लागते—हा नियम आहे. यातून कोणी वाचू शकत नाही. मृत्युसमयी जेव्हा प्राण शरीरातून निघतात, तेव्हा हजारो विंचू शरीरास एकाचवेळी दंश करीत आहेत—अशी तीव्र पीडा होते. जन्मभर कमावलेले धन, घरदार आणि आपला परिवार यांच्याशी कायमचा वियोग होण्याची वेळ येते आणि पुन्हा त्यांच्या भेटीची शक्यता नसते, तेव्हा (ममता, आसक्तीमुळे) फार भयंकर दु:ख होत असते. ज्या धनाला कधी कुणाला दाखवू इच्छित नव्हता, ज्या धनाला तिजोरीत ठेवून परिवारापासून लपविले होते, त्या तिजोरीची चाबी कुंटुबियांच्या हाती गेलेली पाहून त्याच्या मनाला असह्य वेदना होतात. या रीतीने मृत्यूच्या दु:खरूपी दोषांना वारंवार पाहत रहावे.

**( ३ ) म्हातारपण—**वृद्धावस्थेत शरीर आणि अवयवांची शक्ती क्षीण होत असते, ज्यामुळे चालणे-फिरणे, उठणे-बसणे ह्या क्रिया कष्टप्रद होतात. सर्व प्रकारचे भोजन पचत नाही. परिवारात सर्वात वडील असल्याने परिवाराकडून आदराची अपेक्षा ठेवतो परंतु फारसे प्रयोजन न राहिल्यामुळे घरातील सर्वजण निरादर, अपमान करतात. तेव्हा मनात पूर्वीच्या गोष्टी आठवतात की, मी धन कमावले, यांचे पालन-पोषण केले परंतु आज हे माझा तिरस्कार करत आहेत. या गोष्टी आठवल्याने त्याला ह्या उपेक्षेमुळे फार मोठे दु:ख होते. अशा प्रकारे वृद्धावस्थेच्या दु:खरूप दोषांना वारंवार पाहत रहावे.

**( ४ ) रोगांचे दु:ख—**शरीर म्हणजे रोगांचे माहेर घर—"**शरीरं व्याधिमन्दिरम्**". शरीरात वात, कफ, पित्त इत्यादीने उत्पन्न होणारे अनेक प्रकारचे रोग असतात आणि त्या रोगाने शरीराला फार मोठी पीडा होत असते. अशा प्रकारे रोगांच्या दु:खरूपी दोषांना वारंवार पाहत रहावे.

* एका शेठजीने ऐकले की, अमुक दुकानात इतका नफा झाला आहे आणि त्या बरोबरच हेही ऐकेले की, अमुक दुकानात इतके नुकसान झाले आहे. अशा प्रकारे नफा आणि नुकसान या दोन्हीत तर फरक आहे परंतु या दोन्हींच्या ज्ञानात काही फरक नाही. ज्ञान तर एकच आहे. जर ज्ञान एक नसते तर नफा आणि नुकसान दोन्हीच्या भिन्नतेचे ज्ञान कसे झाले असते? त्याचप्रमाणे "मी", "तू", "हा" आणि "तो" हे चारी वेगवेगळे असूनही याचे प्रकाशक ज्ञान एकच आहे. ज्या सामान्य प्रकाशात "मी" मध्ये क्रिया होतात, त्याच प्रकाशात "तू", "हा" आणी 'तो' यांच्यातही क्रिया होतात. त्या सामान्य प्रकाशात "मी" "तू" "हा" आणि "तो" यांचा भेद नाही. त्या सामान्य प्रकाशाचा संबंध जर आहे तर चारीशी आहे, नाही तर कोणाशीच नाही.

वारंवार पाहत रहावे, असे जे म्हटले आहे, त्याचे तात्पर्य, चिंतन करावे असे नसून, केवळ विचार करावा असे आहे. जन्म, मृत्यू, वृद्धावस्था आणि रोगांच्या दुःखांना वारंवार पाहण्याने अर्थात् विचार करण्याने त्यांचे मूळ कारण असलेली उत्पत्ति-विनाशशील पदार्थाविषयीची आसक्ती स्वाभाविकच कमी होत जाते अर्थात् भोगाविषयी वैराग्य उत्पन्न होते. तात्पर्य, जन्म, मृत्यू, वृद्धावस्था इत्यादीच्या दुःखरूपी दोषांना पाहणे हे भोगाविषयी वैराग्य होण्यास हेतू आहे, कारण भोगाच्या आसक्तीने अर्थात् गुणांच्या संगानेच जन्म होत असतो—"**कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु**" (१३।२१) आणि जो जन्म होतो, तो संपूर्ण दुःखाचे कारण आहे. भगवंतांनी पुनर्जन्माला दुःखालय म्हटले आहे. "**पुनर्जन्म दुःखालयमशाश्वतम्**" (८।१५)

शरीरादी जड पदार्थांशी आपला संबंध समजल्याने, त्यांना महत्त्व दिल्याने, त्यांचा आश्रय घेतल्यानेच संपूर्ण दोष उत्पन्न होतात—"**देहाभिमानिनि सर्वे दोषाः प्रादुर्भवन्ति**". परमात्म्याचे स्वरूप अथवा त्यांचाच अंश असल्याने जीवात्मा स्वतः निर्दोष आहे-"**चेतन अमल सहज सुखरासी**" (मानस ७।११७।१)

म्हणूनच जीवात्म्याला दुःख आणि दोष आवडत नाहीत, कारण ते याचे सजातीय नाहीत. जीव स्वतः निर्माण केलेल्या दोषामुळेच नेहमी दुःख भोगत राहतो. म्हणून भगवान् जन्म, मृत्यू, इत्यादीच्या दुःखरूपी दोषांचे मूळ कारण असलेल्या देहाभिमानाला विचारपूर्वक समाप्त करण्यासाठी सांगत आहेत.

**परिशिष्ट भाव**—एक 'दुःखाचा भोग' असतो आणि एक 'दुःखाचा प्रभाव' असतो. दुःखाने दुःखी होणे आणि सुखाची इच्छा करणे 'दुःखाचा भोग' आहे. दुःखाच्या कारणाचा शोध करून त्याला समाप्त करणे 'दुःखाचा प्रभाव' आहे. येथे दुःखाच्या प्रभावाला '**दुःखदोषानुदर्शनम्**' पदाने म्हटले गेले आहे.

दुःखाचा भोग घेतल्याने अर्थात् दुःखी होण्याने विवेक लुप्त होतो. परंतु दुःखाचा प्रभाव झाल्यास विवेक लुप्त होत नाही, तर मनुष्य विवेक दृष्टीने दुःखाच्या कारणाचा शोध करतो आणि शोध करून त्याला समाप्त करतो. सुखाची इच्छा हीच संपूर्ण दुःखांचे कारण आहे. कारण समाप्त झाल्यास कार्य आपोआप समाप्त होते. म्हणून सुखाची इच्छा समाप्त झाल्यास संपूर्ण दुःख नाहीसे होतात.

**असक्तिरनभिष्वङ्गः पुत्रदारगृहादिषु।**
**नित्यं च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु॥ ९॥**

**असक्तिः** = आसक्तिरहित होणे, **पुत्रदारगृहादिषु** = पुत्र, पत्नी, घर इत्यादीत **अनभिष्वङ्गः** = आत्मीयता (घनिष्ठ संबंध) नसणे **च** = आणि **इष्टानिष्टोपपत्तिषु** = अनुकूलता-प्रतिकूलतेच्या प्राप्तीत **नित्यम्,** = चित्ताचे नित्य **समचित्तत्वम्** सम राहणे.

***व्याख्या***— **असक्तिः**—उत्पन्न होणारी (सांसारिक) वस्तू, व्यक्ती, घटना, परिस्थिती इत्यादीविषयी जी प्रियता आहे, त्याला "सक्ती" म्हणतात. त्या सक्तीपासून रहित होण्याला "असक्ती" म्हणतात.

सांसारिक वस्तू, व्यक्ती, इत्यादीपासून सुख घेण्याच्या इच्छेने, सुखाच्या आशेने आणि सुखाच्या भोगानेच मनुष्याची त्यांच्याविषयी आसक्ती, प्रियता होत असते. कारण मनुष्याला संयोगाशिवाय सुख दिसत नाही, म्हणून त्याला संयोगजन्य सुख आवडते. परंतु वास्तविक सुख संयोगाच्या वियोगाने होत असते (६।२३) म्हणून साधकासाठी सांसारिक आसक्तीचा त्याग करणे फार आवश्यक आहे.

**उपाय**—संयोगजन्य सुख आरंभी तर अमृतासारखे दिसते. परंतु परिणामी विषाप्रमाणे होत असते. (१८।३८) संयोगजन्य सुख भोगणाऱ्याला परिणामी दुःख भोगावेच लागते हा नियम आहे. म्हणून संयोगजन्य सुखाच्या परिणामावर दृष्टी गेल्यास त्याविषयी आसक्ती राहणार नाही.

**अनभिष्वङ्गः पुत्रदारगृहादिषु**—पुत्र, स्त्री, घर, धन, जमीन, पशू इत्यादीशी मानलेला जो घनिष्ठ संबंध आहे, गाढ मोह आहे, तादात्म्य आहे, मानलेली एकात्मता आहे, ज्याच्या संबंधाने शरीरावरसुद्धा परिणाम होतो, त्याचे नाव "अभिष्वङ्ग" आहे.* जसे पुत्राशी मातेची एकात्मता असल्याकारणाने जेव्हा पुत्र आजारी पडतो, तेव्हा मातेचे शरीर कमकुवत होते.

* पुत्र, स्त्री इत्यादीबरोबर यथायोग्य वर्तन करणे, त्यांच्याशी आत्मीयता न ठेवता त्यांची सेवा करणे हे, "अभिष्वङ्ग" नाही तर ही तर निर्लिप्तता, असंगता आहे, जी अमरतेचा अनुभव करवून देणारी आहे.

तसेच पुत्राच्या, स्त्रीच्या मृत्यूने मनुष्य म्हणतो की अरेरे, मी मेलो, धन नष्ट झाल्यास म्हणतो मी मारला गेलो, इत्यादी. अशा एकात्मतेपासून रहित होण्यासाठी येथे **''अनभिष्वङ्गः''** पद आले आहे.

**उपाय**—ज्यांच्याशी आपला घनिष्ट संबंध आपण मानला आहे, त्यांची सेवा करावी, त्यांना सुख पोहचवावे, परंतु त्यांच्याकडून सुख घेण्याचा उद्देश ठेऊ नये. त्यांच्यापासून अभिष्वङ्ग (तादात्म्य) नष्ट करण्याचाच उद्देश असावा. जर त्यांच्याकडून सेवा घेण्याचा उद्देश ठेवला तर त्यांच्याशी तादात्म्य होईल. मात्र, त्यांच्या प्रसन्नतेसाठी एखादेवेळी त्यांच्याकडून सेवा घेण्याचा प्रसंग आला तर त्यात आपण खूश होऊ नये कारण खूश झाल्यास अभिष्वङ्ग (तादात्म्य) होईल. तात्पर्य, कोणाशीही आपणाला लिप्त करून घेऊ नये. याविषयी नेहमी सावध रहावे.

**नित्यं च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु**—''इष्ट'' अर्थात् मनोनुकूल वस्तू, व्यक्ती, परिस्थिती, घटना, इत्यादी प्राप्त झाल्यास चित्तात आसक्ती, हर्ष, सुख इत्यादी विकार होऊ नयेत आणि ''अनिष्ट'' अर्थात् मनाच्या प्रतिकूल वस्तू, व्यक्ती इत्यादी प्राप्त झाल्यास चित्तात द्वेष, शोक, दुःख, उद्वेग इत्यादी विकार होऊ नयेत. तात्पर्य अनुकूल-प्रतिकूल परिस्थिती प्राप्त झाल्यास चित्तात निरंतर समता रहावी, चित्तावर त्यांचा कोणताच परिणाम होऊ नये. याला भगवंतांनी **''सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा''** (२।४८) पदांनीही म्हटले आहे.

**उपाय**—मनुष्याला जी काही अनुकूल सामुग्री प्राप्त झालेली आहे त्याला तो आपल्यासाठी मानून सुख भोगत असतो—ही गोष्ट महान् बाधक आहे. कारण संसाराची सामुग्री केवळ संसाराच्या सेवेत उपयोगात आणण्यासाठीच मिळालेली आहे, आपल्या शरीर-इंद्रियांना सुख पोचविण्यासाठी नव्हे. त्याचप्रमाणे मनुष्याला जी काही प्रतिकूल सामुग्री मिळालेली आहे, ती दुःख भोगण्यासाठी मिळालेली नाही, तर संयोगजन्य सुखाचा त्याग करण्यासाठी, मनुष्याला सांसारिक आसक्ती, राग, कामना, ममता इत्यादीपासून सोडविण्यासाठीच मिळालेली आहे. तात्पर्य, अनुकूल आणि प्रतिकूल दोन्ही परिस्थिती मनुष्याला सुखदुःखापासून उन्नत करून (त्या दोन्हीहून अतीत असलेल्या) परमात्मतत्त्वाला प्राप्त करविण्यासाठीच मिळालेली आहे—असे दृढतेने मानून घेतल्याने साधकाचे चित्त इष्ट आणि अनिष्टाच्या प्राप्तीत आपोआप सम राहील.

## मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी।
## विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ॥१०॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **मयि** | = माझ्यात | **भक्तिः** | = भक्ती असणे, | **च** | = आणि |
| **अनन्ययोगेन** | = अनन्ययोग-द्वारा | **विविक्त** | = एकांत स्थानी | **जनसंसदि** | = जनसमुदायात |
| **अव्यभिचारिणी** | = अव्यभिचारिणी | **देश सेवित्वम्** | राहण्याचा स्वभाव असणे | **अरतिः** | = प्रीती नसणे. |

***व्याख्या*—मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी**—संसाराचा आश्रय घेतल्यामुळे साधकाचा देहाभिमान कायम राहतो. हा अभिमान अव्यक्ताच्या ज्ञानात प्रधान बाधा आहे. हा अभिमान समाप्त करण्यासाठी भगवान् येथे तत्त्वज्ञानाचा उद्देश ठेऊन अनन्ययोगद्वारा आपली अव्यभिचारिणी भक्ती करण्याचे साधन सांगत आहेत. तात्पर्य, भक्तीरूपी साधनेनेही देहाभिमान सुगमतेने समाप्त होऊ शकतो.

भगवंताशिवाय इतर कुणाकडून काहीही मिळविण्याची इच्छा नसावी. अर्थात् भगवंताशिवाय मनुष्य, गुरू, देवता, शास्त्र इत्यादी मला त्या तत्त्वाचा अनुभव करवून देऊ शकतात, तसेच आपल्या बल, बुद्धी, योग्यता यांच्या साहाय्याने मी त्या तत्त्वाला प्राप्त करून घेईन—अशा प्रकारे कोणत्याही वस्तू, व्यक्ती इत्यादीचा आश्रय नसावा आणि ''भगवंताच्या कृपेनेच मला त्या तत्त्वाचा अनुभव होईल''—अशा प्रकारे केवळ भगवंताचाच आश्रय, आधार असावा—हे भगवंतामध्ये अनन्ययोग होणे आहे.

आपला संबंध केवळ भगवंताशीच असावा, दुसऱ्या कोणाशीही किंचिन्मात्र नसावा, ही भगवंताच्या ठिकाणी ''अव्यभिचारिणी भक्ती'' होणे आहे.

तात्पर्य, तत्त्वप्राप्तीचे साधन सुद्धा (उपाय) भगवंतच असावेत आणि साध्य देखील (उपेय) भगवंतच असावेत—हीच अनन्ययोगद्वारा भगवंताचे ठिकाणी ''अव्यभिचारिणी भक्ती'' होणे आहे.

ज्या साधकाचे ठिकाणी ज्ञानाबरोबर भक्तीचेही संस्कार असतील, त्याच्यासाठी हे साधन फार उपयोगाचे आहे. भक्तिपरायण साधक जर तत्त्वज्ञानाचा उद्देश ठेऊन

एकमात्र भगवंताचाच आश्रय ग्रहण करत असेल, तर केवळ याच साधनेने तत्त्वज्ञानाची प्राप्ती करून घेऊ शकतो. गुणातीत होण्याच्या उपायांतही भगवंतांनी अव्यभिचारिणी भक्तीची गोष्ट सांगितली आहे (१४।२६)

**शंका**—येथे तर भक्तीने तत्त्वज्ञानाची प्राप्ती सांगितली गेली आहे आणि अठराव्या अध्यायाच्या चौपन्नाव्या-पंचावन्नाव्या श्लोकांत ज्ञानाने भक्तीची प्राप्ती सांगितली गेली आहे. असे का?

**समाधान**—जसे भक्ती दोन प्रकारची असते. साधन भक्ती आणि साध्य-भक्ती, तसेच ज्ञानही दोन प्रकारचे असते. साधन-ज्ञान आणि साध्य-ज्ञान. साध्य-भक्ती आणि साध्य-ज्ञान—दोन्ही तत्त्वत: एकच आहेत. साधन-भक्ती आणि साधन ज्ञान—हे दोन्ही साध्य-भक्ती अथवा साध्य-ज्ञानाच्या प्राप्तीची साधने आहेत. म्हणून भक्तीने तत्त्वज्ञानाची (साध्य-ज्ञान) प्राप्ती म्हटली गेली आहे, तेही योग्य आहे आणि ज्ञानाने परा-भक्तीच्या (साध्य-भक्ती) प्राप्तीविषयी म्हटले आहे, तेही योग्य आहे. म्हणून साधकाने कर्म, ज्ञान अथवा भक्ती, ज्या संस्काराची प्रधानता असेल, त्यानुरूपच साधनेचा अंगीकार करावा. त्यावेळी सावधानी एवढीच ठेवावी की, उद्देश केवळ परमात्म्याचाच असावा, प्रकृती अथवा त्याच्या कार्याचा नसावा. असा उद्देश असल्यावर तो त्याच साधनेने परमात्म्याला प्राप्त करू शकतो.

**शंका**—भगवंतांनी ज्ञानाच्या साधनेत आपली भक्ती का सांगितली? ज्ञानयोगाचा साधक भगवंताची भक्तीसुद्धा करतो काय?

**समाधान**—ज्ञानयोगाचे साधक (जिज्ञासू) दोन प्रकारचे असतात. भावप्रधान (भक्तीप्रधान) आणि विवेकप्रधान (ज्ञानप्रधान).

(१) भावप्रधान जिज्ञासू तो आहे, जो भगवंताचा आश्रय घेऊन तत्त्वाला जाणून घेऊ इच्छितो (७।१६, १३।१८). याच अध्यायाच्या दुसऱ्या श्लोकात **"माम्"**, **"मम"**, तीसऱ्या श्लोकात **"मे"**, या (दहाव्या) श्लोकात **"मयि"** आणि अठराव्या श्लोकात **"मद्भक्त:"** तसेच **"मद्भावाय"** ही पदे येण्याने सिद्ध होते की, अठराव्या श्लोकापर्यंत भाव-प्रधान जिज्ञासूचे प्रकरण आहे. परंतु एकोणीसाव्यापासून ते चौतीसाव्या श्लोकापर्यंत एकवेळेसही **"अस्मद्"** ("मी" वाचक) पदाचा प्रयोग झाला नाही, म्हणून तेथे विवेकप्रधान जिज्ञासूचे प्रकरण आहे. म्हणून येथे भावप्रधान जिज्ञासूचे प्रकरण असल्यामुळे, ज्ञानाच्या साधनेच्या अंतर्गत भक्तीरूपी साधनेचे वर्णन केले गेले आहे.

दुसरी गोष्ट, जसे सात्त्विक भोजनात पुष्टीसाठी तूप अथवा दुधाची आवश्यकता असते, तर तेथे दूध आणि तूप सात्त्विक भोजनाबरोबर मिसळूनही पुष्टी करतात आणि स्वतंत्रपणे उपयोगात आणल्यासही पुष्टी करतात. त्याचप्रमाणे भगवंताची भक्ती ज्ञानाच्या साधनेत मिसळूनही परमात्मप्राप्तीला सहायक होते आणि स्वतंत्रही गुणातीत बनविते. (१४।२६) पातञ्जलयोगदर्शनामध्येही परमात्मप्राप्तीसाठी, अष्टांगयोगाच्या साधनेत, सहायकरूपाने "ईश्वरप्रणिधान" अर्थात् भक्तीरूपी नियम सांगितला आहे* आणि त्याच भक्तीला स्वतंत्ररूपानेही सांगितले आहे.† यावरुन सिद्ध होते की, भक्तीरूपी साधनेत एक आगळीच विशेषता आहे. या विशेषतेमुळेच ज्ञानाच्या साधनेत भक्तीचे वर्णन केले गेले आहे.

(२) विवेकप्रधान जिज्ञासू तो आहे जो सत्-असत्चा विवेक करून, तीव्र विवेक-वैराग्ययुक्त होऊन तत्त्व जाणून घेऊ इच्छितो (१३।१९-३४)

विचार करून पाहिले असता, आजकाल अध्यात्मिक जिज्ञासेची उणीव आणि भोगासक्तीच्या बाहुल्यामुळे विवेक-प्रधान जिज्ञासू फार कमी पाहण्यात येतात. अशा साधकांसाठी भक्तीरूपी साधन फार उपयोगाचे आहे. म्हणून येथे भक्तीचे वर्णन करणे युक्तिसंगत वाटते.

**उपाय**—केवळ भगवंतालाच आपले समजणे आणि भगवंताचाच आश्रय घेऊन श्रद्धा विश्वासपूर्वक भगवन्नामाचा जप, कीर्तन, चिंतन, स्मरण इत्यादी करणे हाच भक्तीचा सुगम उपाय आहे.

**विविक्तदेशसेवित्वम्**—"मी एकांतात राहून परमात्म-तत्त्वाचे चिंतन, भजन-स्मरण, सत्-शास्त्रांचा स्वाध्याय करावे, त्या तत्त्वात खोलवर उतरून तत्त्वाला समजून घ्यावे, माझ्या वृत्तीत आणि माझ्या साधनेत कोणतेही विघ्न अथवा बाधा येऊ नये, माझ्याबरोबर कोणीही नसावे आणि मी कोणाबरोबर राहू नये"-साधकाच्या अशा स्वाभाविक अभिलाषेचे नाव "विविक्तदेशसेवित्व" आहे. तात्पर्य साधकाची आवड तर एकांतातच राहण्याची असली पाहिजे. परंतु असा एकांत मिळाला नाही तर, मनात किंचिन्मात्रही विकार उद्भवता कामा नये. त्याच्या मनात असा विचार यावा की, संसाराच्या संगाचा, संयोगाचा तर आपोआपच वियोग होत आहे आणि स्वरूपात असंगता स्वत:सिद्ध आहे. या स्वत:सिद्ध असंगतेत संसाराचा संग, संयोग, संबंध कधी

* शौचसन्तोषतप:स्वाध्यायेश्वरप्रणिधानानि नियमा:। (योगदर्शन २।३२)
† ईश्वरप्रणिधानाद्वा (योगदर्शन १। २३)

होऊच शकत नाही. म्हणून संसाराचा संग कधी बाधक होऊच शकत नाही.

केवळ निर्जन वनात जाऊन आणि एकटे पडलेले राहून "मी एकांत स्थानी आहे" असे समजणे वास्तविक चूक आहे. कारण संपूर्ण संसाराचे बीज, हे शरीर तर बरोबरच आहे. जोपर्यंत या शरीराशी संबंध आहे, तोपर्यंत संपूर्ण संसाराशी संबंध जडलेलाच आहे. म्हणून एकांत स्थानात जाण्याचा लाभ, जेव्हा देहाभिमानाच्या नाशाचा उद्देश मुख्य असेल, तेव्हाच होईल.

एका तत्त्वाशिवाय संसारात दुसरे काहीच नाही, या निश्चयावर दृढ राहणे—हाच वास्तविक एकांत आहे. ज्या तत्त्वापासून कोणती वस्तू उत्पन्न झाली नव्हती, नाही आणि होणार नाही. ज्याला इंद्रिये नाहीत, प्राण नाही, मन नाही, आणि अंत:करण नाही. ज्याला स्थूलशरीर नाही, सूक्ष्मशरीर नाही आणि कारणशरीरही नाही. ज्याचे व्यष्टी शरीर नाही किंवा ज्याचा समष्टी संसाराशी संबंधही नाही. ज्यात केवळ एक तत्त्वच तत्त्व आहे अर्थात् एका तत्त्वाशिवाय दुसरे काहीच नाही. कारण एका परमात्मतत्त्वाशिवाय पूर्वीही काही नव्हते आणि शेवटीही काही राहणार नाही. मध्यात जे काही प्रतीत होत आहे, ते देखील प्रतीतीद्वाराच प्रतीत होत आहे, अर्थात् ज्यांच्याकडून संसार प्रतीतीस येत आहे, ती इंद्रिये, अंत:करण इत्यादीही स्वत: प्रतीतीच आहेत. म्हणून प्रतीतीद्वाराच प्रतीती होत आहे. आपला (स्वरूपाचा) संबंध शरीर आणि अंत:करणाशी कधी झालाच नाही, कारण शरीर आणि अंत:करण हे प्रकृतीचे कार्य आहे आणि स्वरूप नेहमीच प्रकृतीहून वेगळे आहे. अशा प्रकारे अनुभव करणे हेच वास्तविक "विविक्तदेशसेवित्व" आहे

**अरतिर्जनसंसदि**—सामान्य मनुष्यसमुदायाविषयी प्रीती, रुची नसावी अर्थात् कोठे काय होत आहे, केव्हा काय होईल, कसे होईल इत्यादी इत्यादी सांसारिक गोष्टींना ऐकण्याची कोणतीही इच्छा नसावी. तसेच समाचार ऐकविणाऱ्या लोकांची भेट घ्यावी, काही समाचार त्यांच्याकडून मिळवावेत—अशी किंचित्मात्र इच्छा, त्याविषयी प्रीती नसावी. परंतु जर एखादा तत्त्वाची गोष्ट विचारू इच्छित असेल, साधनेच्या विषयात चर्चा करू इच्छित असेल, त्याच्याशी भेटण्याची जी मनात इच्छा निर्माण होते, ती "**अरतिर्जनसंसदि**" नाही. त्याचप्रमाणे जेथे तत्त्वाची चर्चा होत असेल, परस्परात तत्त्वाचा विचार होत असेल अथवा आपल्या दृष्टीत एखादा परमात्मतत्त्वाला जाणणारा असेल, अशा पुरुषांच्या संगतीची जी आवड असते ती जनसमुदायात आवड म्हटली जात नाही, तर ती आवड आवश्यक आहे. असे म्हटलेही गेले आहे की-

**सङ्गः सर्वात्मना त्याज्यः स चेत्त्यक्तुं न शक्यते।**
**स सद्भिः सह कर्तव्यः सतां सङ्गो हि भेषजम्॥**

(मार्कण्डेय पुराण ३७। २३)

अर्थात् आसक्तिपूर्वक कोणाशीही संग करू नये, परंतु अशी असंगता होत नसेल, तर श्रेष्ठ पुरुषांचा संग करावा. कारण श्रेष्ठ पुरुषांचा संग असंगता प्राप्त होण्याचे औषध आहे.

# अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम्।
# एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा॥ ११ ॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अध्यात्मज्ञान-** | = अध्यात्मज्ञानात | | सर्वत्र पाहणे | **अतः** | = याच्या |
| **नित्यत्वं** | नित्य निरंतर स्थित राहणे, | **एतत्** | = हे (पूर्वोक्त वीस साधन-समुदाय) तर | **अन्यथा** | = उलट आहे, |
| | | | | **अज्ञानम्** | = ते अज्ञान आहे— |
| **तत्त्वज्ञानार्थ-** | = तत्त्वज्ञानाच्या फलरूपी | **ज्ञानम्** | = ज्ञान आहे (आणि) | **इति** | = असे |
| **दर्शनम्** | परमात्म्याला | **यत्** | = जे | **प्रोक्तम्** | = म्हटले गेले आहे. |

***व्याख्या*— अध्यात्मज्ञाननित्यत्वम्**—संपूर्ण शास्त्रांचे तात्पर्य, मनुष्याला परमात्म्याकडे सम्मुख करण्यात, परमात्म-प्राप्ती करविण्यात आहे—असा निश्चय केल्यानंतर परमात्मतत्त्व जितके समजण्यात आले आहे, त्याचे मनन करावे. युक्ति-प्रयुक्तिने पाहिले तर परमात्मतत्त्व भावरूपाने पूर्वीही होते, आत्ताही आहे आणि पुढेही राहील. परंतु संसार पूर्वीही नव्हता आणि पुढेही राहणार नाही, तसेच आत्ताही प्रत्येक क्षणाला अभावात जात आहे. संसाराचा तर उत्पत्ती आणि विनाश होत असतो. परंतु त्याचा जो आधार, प्रकाशक आहे, ते परमात्मतत्त्व नित्य-निरंतर राहत असते. त्या परमात्मतत्त्वाशिवाय संसाराची स्वतंत्र सत्ता नाहीच. परमात्म्याच्या सत्तेनेच संसार सत्ता असणारा दिसत असतो. अशा प्रकारे संसाराच्या स्वतंत्र सत्तेच्या अभावाचे आणि परमात्म्याच्या सत्तेचे नित्य-निरंतर मनन करत राहणे "**अध्यात्मज्ञाननित्यत्वम्**" आहे.

**उपाय**—अध्यात्मिक ग्रंथांचे पठन-पाठन, तत्त्वज्ञ

महापुरुषांकडून तत्त्वज्ञान-विषयक श्रवण आणि प्रश्नोत्तर करणे.

**तत्त्वज्ञानार्थदर्शनम्**—तत्त्वज्ञानाचा अर्थ परमात्मा आहे. त्या परमात्म्याचेच सर्व ठिकाणी दर्शन करणे, त्याचाच सर्व ठिकाणी अनुभव करणे "**तत्त्वज्ञानार्थदर्शनम्**" आहे. तो परमात्मा सर्व देश, काळ, वस्तू, व्यक्ती, घटना, परिस्थिती इत्यादीत जसाच्या तसा परिपूर्ण आहे. एकांतात अथवा व्यवहारात, सर्वकाळी, साधकाची दृष्टी, त्याचे लक्ष्य, केवळ त्या परमात्म्यावरच रहावे. एका परमात्म्याशिवाय त्याला दुसरी कोणती सत्ता दिसूच नये. सर्वत्र, सर्वकाळी, समभावाने परिपूर्ण असलेल्या परमात्म्यालाच त्याचा पाहण्याचा स्वभाव बनावा. हेच "**तत्त्वज्ञानार्थदर्शनम्**" आहे—हे सिद्ध झाल्यास साधकाला परमात्मतत्त्वाचा अनुभव होतो.

**एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा**—"**अमानित्वम्**" पासून "**तत्त्वज्ञानार्थदर्शनम्**" पर्यंत ही जी वीस साधने सांगितली गेली आहेत, ही सर्व साधने देहाभिमान समाप्त करणारी असल्याने आणि परमात्मतत्त्वाच्या प्राप्तीत सहायक असल्याने "ज्ञान" नावाने म्हटली गेली आहेत. या साधनांच्या विपरीत मानित्व, दम्भित्व, हिंसा आदी जितके काही दोष आहेत, ते सर्व देहाभिमान वाढविणारे असल्याने आणि परमात्मतत्त्वापासून विमुख करणारे असल्याने "अज्ञान" नावाने म्हटले गेले आहेत.

### विशेष गोष्ट

शरीराशी मानलेल्या संबंधाचा त्याग करू शकेल इतका तीव्र विवेक साधकात जर जागृत झाला तर त्याच्यात हा साधनसमुदाय आपोआप प्रगट होतो. मग त्याला या साधनांचे वेगवेगळे अनुष्ठान करण्याची आवश्यकता राहत नाही. विनाशी शरीराला आपल्या अविनाशी स्वरूपाहून वेगळे पाहणे हेच मूळ साधन आहे. म्हणून सर्व साधकांनी शरीर आपल्याहून वेगळे असल्याचा अनुभव घेतला पाहिजे, जे वास्तविक वेगळेच आहे.

पूर्वोक्त कोणत्याही साधनेचे अनुष्ठान करण्यासाठी प्रामुख्याने दोन गोष्टींची आवश्यकता आहे (१) साधकाचा उद्देश केवळ परमात्म्याला प्राप्त करण्याचा असावा. (२) शास्त्रे वाचताना-ऐकताना जरी विवेकद्वारा शरीराला आपल्याहून वेगळे समजून घेतले तर मग दुसऱ्या वेळीही त्याच विवेकावर स्थिर रहावे. या दोन गोष्टी दृढ झाल्यास साधन-समुदायाची सर्व साधने सुगम होतात.

शरीर तर बदलून गेले, परंतु मी तोच आहे, जो बालपणी होतो. ही सर्वांच्या अनुभवाची गोष्ट आहे. म्हणून शरीराशी आपला संबंध वास्तविक नसताना केवळ मानलेला आहे—असा निश्चय झाल्यासच वास्तविक साधन आरंभ होते. साधकाची बुद्धी जितक्या अंशात परमात्मप्राप्तीच्या उद्देशाला धारण करते, तितक्या अंशात त्याच्यात विवेकाची जागृती तसेच संसारापासून वैराग्य होत असते. भगवंतांनी विवेक आणि वैराग्याला पुष्ट करण्यासाठी ज्ञानाच्या आवश्यक साधनांचे वर्णन केले आहे.

जेव्हा मनुष्याचा उद्देश परमात्मप्राप्ती करून घेणे हाच होतो, तेव्हा दुर्गुण आणि दुराचारांचे मूळ तुटून जाते, मग साधकाला याचा अनुभव होवो अथवा न होवो. जसे वृक्षाचे मूळ तूटल्यावरही मोठ्या फांदीवर लागलेली पाने काही काळापर्यंत हिरवी दिसतात. परंतु वास्तविक त्या पानांच्या हिरवेपणाचेही मूळ तुटलेले असते. म्हणून काही दिवसानंतर मोठ्या फांदीच्या पानांचे हिरवेपण समाप्त होते. त्याचप्रमाणे परमात्मतत्त्वाच्या प्राप्तीचा उद्देश दृढ होताच दुर्गुण दुराचार समाप्त होतात. जरी साधकाला आरंभी याचा अनुभव येत नसला आणि त्याला आपल्यात अवगुण दिसले, तरीही काही काळानंतर त्यांचा संपूर्णपणे अभाव दिसू लागतो.

साधन करतेवेळी कधी कधी साधकाला आपल्यात दुर्गुण दिसू शकतात. परंतु वास्तविक साधनेत प्रवृत्त होण्या-पूर्वी त्याच्यात जे दुर्गुण होते, तेच जात असलेले दिसतात. दरवाज्यातून पाहिले तर येणारे आणि जाणारे दोन्हीही दिसतात—असा नियम आहे. जर साधन करतेवेळी आपल्यात दुर्गुण वाढत असलेले दिसले तर समजून घ्यावे की, दुर्गुण येत आहेत. परंतु जर दुर्गुण आपल्यात कमी होत असलेले दिसले, तर समजून घ्यावे की, दुर्गुण जात आहेत. अशा अवस्थेत साधकाने निराश होऊ नये, तर आपल्या उद्देशावर दृढ राहून तत्परतेने साधनेत रत राहिले पाहिजे. अशा प्रकारे साधनेत रत राहिल्याने दुर्गुण-दुराचारांचा संपूर्णपणे अभाव होतो.

**परिशिष्ट भाव**—क्षेत्र-क्षेत्रज्ञाच्या विभागाचे ज्ञान करविण्यात कारण असल्याने या वीस साधनांना 'ज्ञान' नावाने म्हटले गेले आहे. जे याच्या उलट आहे, ते अज्ञान आहे. साधन न करता मनुष्य ज्ञानाच्या गोष्टी तर शिकू शकतो, परंतु अनुभव करू शकत नाही. म्हणून साधन न केल्यास अज्ञान (क्षेत्र-क्षेत्रज्ञाला एक समजणे) राहते आणि अज्ञान राहून जर कोणी शिकून क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाच्या विभागाचे विवेचन करतो तर तो वास्तविक देहाभिमानालाच पुष्ट करतो. परंतु जो हे साधन करतो, त्यात क्षेत्र-क्षेत्रज्ञाचा विभाग करण्याची योग्यता येते.

***संबंध**—पूर्वोक्त ज्ञान (साधनसमुदाय) द्वारा ज्याला जाणून घेतले जाते, त्या साध्य-तत्त्वाचे "ज्ञेय" नावाने आता वर्णन आरंभ करतात.*

**ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वामृतमश्नुते।**
**अनादिमत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते॥ १२॥***

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यत्** | = जे | **यत्** | = जे | **ब्रह्म** | = ब्रह्म आहे. |
| **ज्ञेयम्** | = ज्ञेय (पूर्वोक्त ज्ञानाने जाणण्याला योग्य) आहे, | **ज्ञात्वा** | = जाणल्याने (मनुष्य) | **तत्** | = त्याला |
| **तत्** | = त्याला (परमात्म-तत्त्वाला) | **अमृतम्** | = अमरतेचा | **न, सत् उच्यते** | = सत्‌ही म्हणता येऊ शकत नाही (किंवा) |
| **प्रवक्ष्यामि** | = मी उत्तम प्रकारे सांगेन, | **अश्नुते** | = अनुभव करतो. | **न, असत्** | = असत्‌ही (म्हणता |
| | | **अनादिमत्** | = (ते ज्ञेय तत्त्व अनादी) | **उच्यते** | येऊ शकत नाही). |
| | | **परम्** | = (आणि) परम | | |

*व्याख्या*— **ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि**—भगवान् या ठिकाणी ज्ञेय तत्त्वाच्या वर्णनाचा उपक्रम करीत असताना प्रतिज्ञा करीत आहेत की, ज्याच्या प्राप्तीसाठीच मनुष्यशरीर मिळाले आहे, ज्याचे वर्णन उपनिषद् शास्त्र आणि ग्रंथ यामध्ये केले गेले आहे, त्या प्रापणीय, ज्ञेय तत्त्वाचे मी उत्तम प्रकारे वर्णन करतो.

**ज्ञेयम्**—(अवश्य जाणून घेण्यायोग्य) म्हणण्याचे तात्पर्य, संसारात जितके म्हणून विषय, पदार्थ, विद्या, कला इत्यादी आहेत, ते सर्व अवश्य जाणून घेण्यायोग्य नाहीत. अवश्य जाणून घेण्यायोग्य एक परमात्माच आहे. कारण सांसारिक विषयांना कितीही जाणून घेतले, तरी जाणून घेणे शिल्लकच राहील. सांसारिक विषयांच्या माहितीने जन्म-मरणदेखील समाप्त होत नाही. परंतु परमात्म्याला तत्त्वाने योग्य जाणून घेतल्यावर, जाणून घेणे शिल्लक राहणार नाही आणि जन्म-मरणही समाप्त होईल. म्हणून संसारात परमात्म्या-शिवाय जाणून घेण्याला योग्य दुसरे काही नाहीच.

**यज्ज्ञात्वामृतमश्नुते**—त्या ज्ञेय तत्त्वाला जाणून घेतल्यावर अमरतेचा अनुभव होतो. अर्थात् स्वत:सिद्ध तत्त्वाची प्राप्ती होते. ज्याची प्राप्ती झाल्यावर जाणणे, करणे, मिळविणे इत्यादी काहीही शिल्लक राहत नाही.

वास्तविक, स्व पूर्वीपासूनच अमर आहे, पण त्याने मरणशील शरीरादीशी एकता करून आपल्या स्वत:ला जन्मणारा आणि मरणारा मानून घेतले आहे. परमात्मतत्त्वाला जाणून घेतल्याने हा भ्रम समाप्त होतो आणि तो आपल्या वास्तविक स्वरूपाला ओळखतो, अर्थात् अमरतेचा अनुभव करतो.

**अनादिमत्**—ज्यापासून यावन्मात्र संसार उत्पन्न होतो, त्यातच राहतो आणि शेवटी त्यातच लीन होतो. परंतु तो आदी, मध्य आणि अंती जसाच्या तसा विद्यमान राहतो. म्हणून तो ''अनादी'' म्हणविला जातो.

**परं ब्रह्म**—''**ब्रह्म**'' प्रकृतीलाही म्हणतात, वेदालाही म्हणतात, परंतु ''परम ब्रह्म'' तर एक परमात्माच आहे. ज्यापेक्षा श्रेष्ठ दुसरे कोणी व्यापक, निर्विकार, सदा राहणारे तत्त्व नाही, ते ''परम ब्रह्म'' म्हटले जाते.

**न सत्तन्नासदुच्यते**—त्या तत्त्वाला ''सत्'' ही म्हणू शकत नाही आणि ''असत्'' ही म्हणू शकत नाही. कारण असत्‌च्या भावनेविना (सत्ता) त्या परमात्मतत्त्वात सत् शब्दाचा प्रयोग होत नाही. म्हणून त्याला ''सत्'' म्हणू शकत नाही. त्या परमात्मतत्त्वाचा कधी अभाव होत नाही, म्हणून त्याला ''असत्'' ही म्हणू शकत नाही. तात्पर्य, त्या परमात्मतत्त्वात सत्-असत् शब्दांची अर्थात् वाणीची प्रवृत्तीच होत नाही—असे ते करणनिरपेक्ष तत्त्व आहे.

जसे पृथ्वीवर रात्र आणि दिवस होत असतात. यातही दिवसाच्या अभावाला ''रात्र'' आणि रात्रीच्या अभावाला ''दिवस'' म्हणतात. परंतु सूर्यात रात्र आणि दिवस हे दोन भेद होत नाहीत. कारण रात्र तर सूर्यात नाहीच आणि रात्रीचा अत्यंत अभाव असल्याकारणाने सूर्यात दिवसही म्हणू शकत नाही. कारण ''दिवस'' शब्दाचा प्रयोग रात्रीच्या सापेक्षात केला जातो. जर रात्रीची सत्ता नसेल तर दिवसही म्हणू शकत नाही, रात्रही म्हणू शकत नाही. त्याचप्रमाणे ''सत्'' च्या सापेक्षात ''असत्'' शब्दाचा प्रयोग होत असतो आणि ''असत्'' च्या सापेक्षात ''सत्'' शब्दाचा प्रयोग होत असतो. जेथे परमात्म्याला ''सत्'' म्हटले जाते, तेथे ''असत्'' च्या

* या श्लोकामध्ये भगवंतांनी ''प्रवक्ष्यामि'' पदाने ज्ञेय तत्त्वाचे वर्णन करण्यासाठी प्रतिज्ञा केली आहे. ''अमृतमश्नुते'' पदाने त्याला जाणण्याचे फल सांगितले ''अनादिमत्'' पदाने त्याचे लक्षण सांगितले आहे. ''परं ब्रह्म'' पदाने त्याचे नाव सांगितले आणि ''न सत्तन्नासदुच्यते'' पदांनी त्याचे वर्णन केले आहे.

सापेक्षातच म्हटले जाते. परंतु जेथे ''असत्'' चा अत्यंत अभाव आहे, तेथे परमात्म्याला ''सत्'' म्हणू शकत नाही आणि जे परमात्मा निरंतर ''सत्'' आहेत त्यांना ''असत्'' म्हणू शकत नाही. म्हणून परमात्म्यात सत् आणि असत् या दोन्ही शब्दांचा प्रयोग होत नाही. जसे सूर्य रात्र-दिवस दोन्हीहून विलक्षण केवळ प्रकाशरूप आहे, त्याचप्रमाणे ते ज्ञेय तत्त्व सत्-असत् दोन्हीपेक्षा विलक्षण आहे*.

दुसरी गोष्ट, सत्-असत्चा निर्णय बुद्धी करत असते आणि असे म्हणणेही जेव्हा ते मन, वाणी आणि बुद्धीचा विषय असते, तेव्हाच म्हटले जाते. परंतु ज्ञेय तत्त्व मन, वाणी आणि बुद्धीच्या अत्यंत पलीकडचे आहे, म्हणून त्याची सत्-असत् संज्ञा होऊ शकत नाही.

**परिशिष्ट भाव**—परमात्मतत्त्वाला **'ज्ञेय'** म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, ते तत्त्व जाणण्यायोग्य आहे, त्याला जाणून घ्यावे आणि ते जाणणे शक्य आहे अर्थात् जाणले जाऊ शकते. वास्तविक ते तत्त्व जाणण्यात येत नाही, कारण प्रकृतीहून अतीत असल्याकारणाने ते प्रकृतीच्या पकडीत येत नाही. परंतु ते स्वयंद्वारा प्राप्त केले जाऊ शकते.

प्रकृती आणि पुरुष—दोघांना अनादी म्हटले गेले आहे (गीता—याच अध्यायाचा एकोणीसावा श्लोक). म्हणून दोघांचा मालक असल्याने परमात्म्याला येथे **'अनादिमत्'** अर्थात् अनादी म्हटले गेले आहे.† सातव्या अध्यायाच्या चवथ्या-पाचव्या श्लोकांत भगवंताने अपरा-प्रकृतीला **'इतीयं मे'** म्हणून आणि परा-प्रकृतीला (जीवात्म्याला) **'मे परमम्'** म्हणून दोघांना आपल्या अधीन सांगितले आहे. म्हणून दोघांचे मालक भगवान् झाले उपनिषद यातही आले आहे—**क्षरं प्रधानममृताक्षरं हरः क्षरात्मानावीशते देव एकः।** (श्वेताश्वतर० १।१०)

'प्रकृती तर क्षर (परिवर्तनशील) आहे आणि हिला भोगणारा पुरुष (जीवात्मा) अमृतस्वरूपी अक्षर (अपरिवर्तनशील) आहे. या दोघांना (प्रकृती आणि पुरुष यांना) एक ईश्वर आपल्या शासनाखाली ठेवतो.'

गीतेत एकाच समग्र परमात्म्याचे तीन प्रकाराने वर्णन आले आहे—

(१) परमात्मा सत्‌ही आहे आणि असत्‌ही आहे—**'सदसच्चाहम्'** (९।१९).

(२) परमात्मा सत्‌ही आहे आणि असत्‌ही आहे आणि सत्-असत्‌हून परही आहे—**'सदसत्तत्परं यत्'** (११।३७).

(३) परमात्मा सत्‌ही नाही आणि असत्‌ही नाही—**'न सत्तन्नासदुच्यते'** (१३।१२).

याचे तात्पर्य हे आहे की, वास्तविक एका परमात्म्याशिवाय काहीही नाही. तो मन, बुद्धी आणि वाणीहून संपूर्णपणे अतीत आहे. म्हणून त्याचे वर्णन केले जाऊ शकत नाही, परंतु त्याला प्राप्त केले जाऊ शकते.

वास्तविक परमात्मतत्त्वाचे वर्णन शब्दाने करू शकत नाही. त्याला असत्‌च्या सापेक्षाने सत्, विकाराच्या सापेक्षाने निर्विकार, एकदेशीयच्या सापेक्षाने सर्वदेशीय म्हटले जाते. परंतु वास्तविक त्या तत्त्वात सत्, निर्विकार इत्यादी शब्द लागू होतच नाहीत. कारण सर्वच शब्दांचा प्रयोग सापेक्षाने आणि प्रकृतीच्या संबंधाने होतो. परंतु तत्त्व निरपेक्ष आणि प्रकृतीहून अतीत आहे. देश, काळ, वस्तू, व्यक्ती, अवस्था, गुण इत्यादीनुसारच संज्ञा बनते. परमात्म्यात देश, काळ इत्यादी नाहीतच, मग त्यांची संज्ञा काय म्हणून! म्हणून येथे आले आहे की, त्या तत्त्वाला सत्‌ही म्हटले जाऊ शकत नाही आणि असत्‌ही म्हटले जाऊ शकत नाही.

परमात्मतत्त्वाचा आदी (आरंभ) नाही. जो नेहमीसाठी आहे त्याचा आदी कसा? सर्व अपर आहे, तो पर आहे, ते सत्‌ही नाही किंवा असत्‌ही नाही. आदी-अनादी, पर-अपर आणि सत्-असत्‌चा भेद प्रकृतीच्या संबंधाने आहे. ते तत्त्व तर आदी-अनादी, पर-अपर आणि सत्-असत्‌हून विलक्षण आहे. अशाप्रकारे भगवंतांनी ज्ञेय-तत्त्वाचे वर्णन करण्याची जी गोष्ट सांगितली आहे, ते वास्तविक वर्णन नाही, तर लक्ष्यक अर्थात् लक्ष्याकडे दृष्टी करविणारे आहे. याचे तात्पर्य ज्ञेय-तत्त्वाचे लक्ष्य करविण्यात आहे, केवळ वर्णन करण्यात नाही. म्हणून साधकानेही लक्ष्याच्या दृष्टीनेच विचार करावा केवळ शिकण्याचा दृष्टिकोन नसावा.

***संबंध**—पूर्व श्लोकात ''ते तत्त्व सत् म्हटले जाऊ शकत नाही आणि असत्‌ही म्हटले जाऊ शकत नाही''-असे म्हणून ज्ञेय तत्त्वाचे निर्गुण-निराकाररूपाने वर्णन केले. आता पुढील श्लोकात त्याच ज्ञेय तत्त्वाचे सगुण-निराकाररूपाने वर्णन करत आहेत.*

---

* राम सच्चिदानंद दिनेसा। नहिं तहँ मोह निसा लवलेसा॥
सहज प्रकासरूप भगवाना। नहिं तहँ पुनि बिग्यान बिहाना॥ (मानस १।११६।३)

† 'अनादि मत्परं ब्रह्म' पदांचा असा अर्थही होऊ शकतो—'अनादि, मत्परं ब्रह्म' अर्थात् ब्रह्म माझ्या परायण (आश्रित) आहे—'ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहम्' (गीता १३।२७).

**सर्वत:पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम्।**
**सर्वत:श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति॥ १३॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तत्** | = ते (परमात्मा) | **मुखम्** | आणि मुख असलेले (तसेच) | **लोके** | = ते संसारात |
| **सर्वत:** | = सर्व ठिकाणी हात | | | **सर्वम्** | = सर्वांना |
| **पाणिपादम्** | व पाय असलेले, | **सर्वत:श्रुतिमत्** | = सर्वत्र कान असलेले आहेत. | **आवृत्य** | = व्याप्त करून |
| **सर्वतोऽक्षिशिरो-** | = सर्वत्र नेत्र, मस्तक | | | **तिष्ठति** | = स्थित आहेत. |

*व्याख्या*— **सर्वत:पाणिपादं तत्**—जसे शाईमध्ये सर्वत्र सर्व तऱ्हेच्या लिपी विद्यमान असतात, म्हणून लेखक शाईने सर्व प्रकारच्या लिपी लिहू शकतो. सोन्यामध्ये सर्वत्र सर्व प्रकारचे अलंकार विद्यमान असतात, म्हणून सोनार सोन्यातून कोणत्याही ठिकाणाहून जो अलंकार बनवू इच्छिल, बनवू शकतो. त्याचप्रमाणे भगवंताचे सर्वत्रच हात, पाय आहेत. म्हणून भक्त भक्तीने जेथे कोठे, जे काही भगवंताच्या हातामध्ये देऊ इच्छितो, अर्पण करू इच्छितो, ते ग्रहण करण्यासाठी त्याच ठिकाणी भगवंताचे हात विद्यमान असतात. भक्ताची बाहेरुन देण्याची इच्छा असो की मनाने देण्याची असो, पूर्वेला असो की पश्चिमेला असो, उत्तरेला असो की दक्षिणेला असो, त्याला ग्रहण करण्यासाठी तेथेच भगवंताचे हात विद्यमान असतात. त्याचप्रमाणे भक्त जलात, स्थलात, अग्नीत जेथे कोठे एखाद्या संकटात सापडला तर भगवंताचा धावा करतो, त्याचे रक्षण करण्यासाठी तेथेच भगवंताचे हात तयार असतात अर्थात् भगवान् तेथेच आपल्या हाताने त्याचे रक्षण करतात.

भक्त जेथे-कोठे भगवंताच्या चरणाला चंदन लाऊ इच्छितो, फूल वाहू इच्छितो, नमस्कार करू इच्छितो, त्याच ठिकाणी भगवंताचे पाय विद्यमान असतात. हजारो-लाखो भक्त एकाचवेळी भगवंताच्या चरणांची स्वतंत्र पूजा करू इच्छितील, तर त्यांच्या भावनेप्रमाणे त्याच ठिकाणी भगवंताचे चरण विद्यमान असतात.

**सर्वतोऽक्षिशिरोमुखम्**—भक्त भगवंताला जेथे दीपक दाखवितो, आरती ओवाळतो तेथेच भगवंताचे डोळे आहेत. भक्त जेथे शरीराने अथवा मनाने नृत्य करत असतो तेथेच भगवान् त्याच्या नृत्याला पाहतात. तात्पर्य, जो भगवंताना सर्व ठिकाणी पाहतो, भगवंतही त्याच्या दृष्टिआड होत नाहीत (६।३०)

भगवंताच्या कपाळावर भक्त जेव्हा चंदन लावू इच्छितो, पुष्प वाहू इच्छितो तेथेच भगवंताचे मस्तक असते.

भक्त जेथे भगवंताना नैवेद्य दाखवू इच्छितो, तेथेच भगवंताचे मुख असते अर्थात् भक्ताद्वारा भक्तिपूर्वक दिलेल्या पदार्थांना भगवान् तेथेच खाऊन टाकतात. (९।२६)

**सर्वत: श्रुतिमत्**—भक्त जेथे कोठे आर्तस्वराने प्रार्थना करतो, हळुवाररीतीने प्रार्थना करतो अथवा मनाने प्रार्थना करतो, तेथेच भगवान् आपल्या कानांनी ऐकत असतात.

मनुष्यांचे सर्व अवयव (अंग) सर्व ठिकाणी नसतात अर्थात् जेथे डोळे आहेत, तेथे कान नसतात आणि जेथे कान असतात तेथे डोळे नसतात. जेथे हात आहेत तेथे पाय नसतात आणि जेथे पाय असतात तेथे हात नसतात इत्यादी. परंतु भगवंताची इंद्रिये, त्यांचे अवयव सर्व ठिकाणी आहेत. म्हणून भगवान् डोळ्यांनी ऐकू शकतात, बोलूही शकतात, ग्रहणही करू शकतात इत्यादी. तात्पर्य, ते सर्व अवयवाने सर्व क्रिया करू शकतात, कारण त्यांच्या सर्व अवयवात सर्व अवयव विद्यमान असतात. त्यांच्या लहानातल्या लहान अंशातही सर्वची सर्व इंद्रिये असतात.

भगवंताचे सर्वत्र हात, पाय, डोळे, शिर, मुख आणि कान म्हणण्याचे तात्पर्य, भगवान् कोणत्याही प्राण्यापासून दूर-नाहीत. कारण भगवान् संपूर्ण देश, काळ, वस्तू, व्यक्ती, घटना, परिस्थिती इत्यादीत परिपूर्णरूपाने व्याप्त आहेत. संतांनी म्हटले आहे.

**चहुँ दिसि आरति चहुँ दिसि पूजा। चहुँ दिसि राम और नहि दूजा॥**

संसारी मनुष्याला ज्याप्रमाणे बाहेरुन आतून, वर-खाली, सर्वत्र संसारच संसार दिसत असतो, संसाराशिवाय दुसरे काही दिसतच नाही, त्याचप्रमाणे परमात्म्याला तत्त्वाने जाणणाऱ्या पुरुषाला सर्वत्र परमात्माच परमात्मा दिसत असतात.

**लोके सर्वमावृत्य तिष्ठति**—अनंत सृष्टी आहेत, अनंत ब्रह्मांड आहेत, अनंत ऐश्वर्य आहे आणि त्या सर्वात देश, काळ, वस्तू, व्यक्ती इत्यादीही अनंत आहेत, ते सर्वच परमात्म्याच्या अंतर्गत आहेत. परमात्मा त्या सर्वांना व्याप्त करून स्थित आहे. दहाव्या अध्यायाच्या बेचाळीसाव्या श्लोकातही भगवंतांनी म्हटले आहे की, मी संपूर्ण संसाराला एका अंशाने व्याप्त करून स्थित आहे.

**परिशिष्ट भाव**—परमात्म्यात सर्वत्र सर्व काही आहे. जसे पेन आणि शाई यात कोणत्या जागी कोणती लिपी नाही? जाणकार मनुष्य त्या एकाच पेन आणि शाईने अनेक लिपी लिहितो. सोन्याच्या डळ्यात कोणत्या स्थानी कोणता अलंकार नाही? सोनार त्या एका डळ्यातून कडे, कंठा, हार, नथ इत्यादी अनेक अलंकार निर्माण करतो. त्याचप्रमाणे लोखंडात कोणत्या जागी कोणते अवजार अथवा अस्त्र-शस्त्र नाही? माती आणि दगडात कोणत्या जागी कोणती मूर्ती नाही? तसेच परमात्म्यात कोणत्या ठिकाणी कोणती वस्तू नाही? परमात्म्यापासूनच ही सर्व सृष्टी उत्पन्न झाली आहे, त्यातच स्थित राहते आणि शेवटी त्यातच लीन होते. पूर्वीही तीच आहे, नंतरही तीच आहे मग मध्यात दुसरी वस्तू कशी येईल? कुठून येईल? ही गोष्ट साधकाने दृढतेने स्वीकार केली तरमग परमात्मा दिसू लागेल. कारण वास्तविक तोच आहे, दुसरी वस्तू नाहीच. भगवान् म्हणतात—

**अहमेवासमेवाग्रे नान्यद् यत् सदसत् परम्। पश्चादहं यदेतच्च योऽवशिष्येत सोऽस्म्यहम्॥**

(श्रीमद्भा० २। ९। ३२)

'सृष्टीच्या पूर्वीही मीच विद्यमान होतो. माझ्याशिवाय दुसरे काहीही नव्हते आणि सृष्टी उत्पन्न झाल्यावर जो काहीही हा संसार दिसतो, तेही मीच आहे. सत्, असत् आणि सत्-असत्हून पलीकडे जी काही कल्पना केली जाऊ शकते, तीही मीच आहे. सृष्टीशिवायही जे काही आहे, ते मीच आहे आणि सृष्टीचा नाश झाल्यावर जे काही शिल्लक राहते ते मीच आहे.'

तात्पर्य हे आहे की, सत्ता एकच आहे. द्वन्द्वांत सापडल्यामुळे त्याचा अनुभव येत नाही.

***संबंध**—पूर्व श्लोकात सगुण-निराकाराचे वर्णन करून आता पुढील श्लोकात त्याची विलक्षणता सर्वव्यापकता आणि सर्वसमर्थता याचे वर्णन करीत आहेत.*

## सर्वेन्द्रियगुणाभासं सर्वेन्द्रियविवर्जितम्।
## असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च॥ १४॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **सर्वेन्द्रिय** | = ते (परमात्मा) | | करणारे आहेत. | | करणारे आहेत |
| **विवर्जितम्** | संपूर्ण इन्द्रियांनी रहित आहेत (आणि) | **असक्तम्** | = आसक्तिरहित आहेत | **च, एव** | = तसेच |
| | | **च** | = आणि | **निर्गुणम्** | = गुणरहित आहेत (आणि) |
| **सर्वेन्द्रिय गुणाभासम्** | = संपूर्ण इंद्रियांच्या विषयांना प्रकाशित | **सर्वभृत्** | = संपूर्ण संसाराचे भरण-पोषण | **गुणभोक्तृ** | = संपूर्ण गुणांचे भोक्ते आहेत. |

***व्याख्या*—सर्वेन्द्रियगुणाभासंसर्वेन्द्रियविवर्जितम्**—प्रथम परमात्मा आहे मग परमात्म्याची शक्ती प्रकृती आहे. प्रकृतीचे कार्य महत्तत्त्व, महत्तत्त्वाचे कार्य अहंकार, अहंकाराचे कार्य पंचमहाभूत, पंचमहाभूतांचे कार्य मन आणि दहा इंद्रिये आणि दहा इंद्रियांचे कार्य पाच विषय*, हे सर्व प्रकृतीचे कार्य आहे. परमात्मा प्रकृती आणि त्याच्या कार्याच्या पलीकडचे आहेत. ते मग सगुण असोत की निर्गुण, साकार असोत अथवा निराकार, नेहमी प्रकृतीच्या पलीकडेच असतात. ते अवतार घेतात, तरीही प्रकृतीहून अतीतच राहतात. अवताराच्या वेळी ते प्रकृतीला आपल्या वश करून प्रगट होत असतात.

जो स्वत:ला गुणांनी लिप्त, गुणांनी बांधलेला समजून जन्मत-मरत होता, तो बद्ध जीवच जर परमात्म्याला प्राप्त झाल्यावर गुणातीत (गुणांनी रहित) म्हटला जातो, तर मग परमात्मा गुणांनी बद्ध कसे होऊ शकतात? ते तर नेहमी- च गुणातीत (रहित) आहेत. म्हणून ते प्राकृत इंद्रियांनी रहित आहेत अर्थात् संसारी जीवाप्रमाणे हात, पाय, डोळे, मुख, कान इत्यादी इंद्रियांनी युक्त नाहीत, परंतु त्या-त्या विषयाला ग्रहण करण्यात संपूर्णपणे समर्थ आहेत.† जसे ते कानांनी रहित असूनही भक्ताची हाक ऐकतात, त्वचेने रहित असूनही भक्ताला अलिंगन देतात,

* विषयांचे ज्ञान इंद्रियांनेच होते. इंद्रियेच विषयांना प्रकाशित करतात. म्हणून विषय इंद्रियांचे कार्य आहे.

† अपाणिपादो जवनो ग्रहीता पश्यत्यचक्षुः स श्रृणोत्यकर्णः। (श्वेताश्वतरोपनिषद् ३। १९)

ते परमात्मा हात पाय नसतानाही ग्रहण करण्यात समर्थ तसेच वेगाने चालणारे आहेत. ते नेत्राशिवायच पाहतात आणि कानाशिवायच ऐकतात.

(२) बिनु पद चलइ सुनइ बिनु काना। कर बिनु करम करइ बिधी नाना॥
आनन रहित सकल रस भोगी। बिनु बानी बकता बड जोगी॥
तन बिनु परस नयन बिनु देखा। ग्रहइ घ्रान बिनु बास असेषा॥ (मानस १। ११८। ३-४)

डोळ्यांनी रहित असूनही प्राणिमात्रांना निरंतर पाहत असतात, रसनेने रहित असूनही भक्तांनी दाखविलेल्या नैवेद्याचा भोग घेतात इत्यादी इत्यादी. अशा प्रकारे ज्ञानेंद्रियांनी रहित असूनही परमात्मा शब्द, स्पर्श इत्यादी विषयांना ग्रहण करतात. तसेच ते वाणीने रहित असूनही आपल्या आवडत्या भक्ता- बरोबर बोलतात, पायरहित असूनही भक्ताची हाक ऐकताच धावत येतात, हातांनी रहित असूनही भक्तांनी दिलेल्या उपहाराला ग्रहण करतात इत्यादी इत्यादी. याप्रमाणे कर्मेंद्रियांनी रहित असूनही परमात्मा कर्मेंद्रियांचे सर्व कार्य करतात. हेच इंद्रियांनी रहित असून भगवंताचे इंद्रियांच्या विषयांना प्रकाशित करणे आहे.

**असक्तं सर्वभृच्चैव**—भगवंताचे सर्व प्राण्यांविषयी आपलेपणा, प्रेम आहे परंतु कोण्याही प्राण्यात ते आसक्त नाहीत. आसक्ती नसतानाही ते ब्रह्मदेवापासून मुंगीपर्यंत संपूर्ण प्राण्यांचे पालन-पोषण करतात. जसे माता-पिता आपल्या बालकाचे पालन-पोषण करतात, त्यापेक्षा किती तरी पटीने अधिक भगवान् प्राण्यांचे पालन-पोषण करतात. कोणता प्राणी कोठे आहे आणि कोण्या प्राण्याला केव्हा कोण्या वस्तू इत्यादीची आवश्यकता आहे, हे पूर्णपणे जाणत असून भगवान् ती वस्तू आवश्यकतेनुसार योग्य रीतीने पोहच करतात. प्राणी पृथ्वीवर असो, समुद्रात असो, आकाशात असो अथवा स्वर्ग इत्यादीत असो अर्थात् त्रैलोक्यात कोठेही एखादा लहानात लहान आणि मोठ्यातला मोठा प्राणी असो, त्याचे पालन-पोषण भगवान् करतात. प्राणीमात्राचे सुहृद असल्याने ते अनुकूल-प्रतिकूल परिस्थितीद्वारा पाप-पुण्यांचा नाश करून प्राणीमात्रांना शुद्ध पवित्र करीत राहतात.

**निर्गुणं गुणभोक्तृ च**—ते परमात्मा संपूर्ण गुणांनी रहित असूनही संपूर्ण गुणांचे भोक्ते आहेत. तात्पर्य, ज्याप्रमाणे माता-पिता बालकाच्या सर्व क्रियांना पाहून प्रसन्न होत असतात, त्याचप्रमाणे परमात्मा भक्ताकडून झालेल्या सर्व क्रियांना पाहून प्रसन्न होतात अर्थात् भक्त-लोक ज्या काही क्रिया करत असतात, त्या सर्व क्रियांचे भोक्ता भगवान् बनतात.

**परिशिष्ट भाव**—या प्रकरणात ब्रह्माची प्रधानता असूनही प्रस्तुत श्लोकात 'समग्र' परमात्म्याचे वर्णन झाले आहे. हे समग्रच ज्ञेय-तत्त्व आहे. म्हणून समग्राची मुख्यता ज्ञान आणि भक्ती—दोन्हीत आहे—**'वासुदेवः सर्वम्'** (गीता ७। १९), **'सर्वं खल्विदं ब्रह्म'** (छान्दोग्य० ३। १४। १).

या श्लोकाचे तात्पर्य हे आहे की, एका परमात्म्याशिवाय इतर कोणाचीही सत्ता नाही. आपण जे काही बोलू, ते परमात्म्याहून वेगळे नाही. सर्वांहून रहित तोच आहे सर्वांसहही तोच आहे.

## बहिरन्तश्च भूतानामचरं चरमेव च।
## सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चान्तिके च तत्॥ १५॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तत्** | = ते (परमात्मा) | | (प्राण्यांच्या रूपात) | | (तेच आहेत) |
| **भूतानाम्** | = संपूर्ण प्राण्यांच्या | **एव** | = देखील (तेच आहेत) | **च** | = आणि |
| **बहिः, अन्तः** | = अंतर्बाह्य (परिपूर्ण आहेत) | **च** | = आणि | **तत्** | = ते |
| | | **दूरस्थम्** | = दूरात दूर | **सूक्ष्मत्वात्** | = अत्यंत सूक्ष्म असल्याने |
| **च** | = आणि | **च** | = तसेच | | |
| **चरम्, अचरम्** | = चर-अचर | **अन्तिके** | = जवळात जवळही | **अविज्ञेयम्** | = जाणण्यात येत नाहीत. |

*व्याख्या*— [ज्ञेय तत्त्वाचे वर्णन बाराव्यापासून सतराव्या श्लोकापर्यंत एकूण सहा श्लोकांत झाले आहे. त्यापैकी हा पंधरावा श्लोक चौथा आहे. या श्लोकाच्या अंतर्गत पहिल्या तीन श्लोकांचा आणि पुढील दोन श्लोकांचा भावही आलेला आहे. म्हणून हा श्लोक ह्या प्रकरणाचे सार आहे]

**बहिरन्तश्च भूतानामचरं चरमेव च**—जसे बर्फापासून तयार झालेल्या भांड्याला समुद्रात टाकले तर त्या भांड्याच्या बाहेरही पाणी आहे, आतही पाणी आहे आणि ते स्वतःही (बर्फापासून तयार झालेल्याकारणाने) पाणीच आहे. त्याचप्रमाणे संपूर्ण चर-अचर प्राण्यांच्या बाहेरही परमात्मा आहेत, आतही परमात्मा आहेत आणि ते स्वतःही परमात्मस्वरूपच आहेत. तात्पर्य, जसे भांड्यात पाण्या-शिवाय दुसरे काहीही नाही, अर्थात् सर्व काही पाणीच

पाणी आहे. तसेच संसारात परमात्म्याशिवाय दुसरे कोणतेही तत्त्व नाही अर्थात् सर्व काही परमात्माच परमात्मा आहेत. याच विषयाला भगवंतांनी महात्म्यांच्या दृष्टीने "**वासुदेवः सर्वम्**" (७।१९) आणि आपल्या दृष्टीने "**सदसच्चाहम्**" (९।१९) म्हटले आहे.

**दूरस्थं चान्तिके च तत्**—कोणत्याही वस्तूचे दूर आणि जवळ असणे तीन दृष्टींनी म्हटले जाते—"देशकृत, काळकृत आणि वस्तुकृत". परमात्मा तिन्ही दृष्टींनीही दूरात दूर आणि जवळात जवळ आहेत. जसे दूरच्या दूर देशातही तेच परमात्मा आहेत आणि जवळच्या जवळ देशातही तेच परमात्मा आहेत.* अगदी प्रथम तेच परमात्मा होते तर शेवटात शेवटीही तेच परमात्मा राहतील. आत्ताही तेच परमात्मा आहेत, संपूर्ण वस्तूंच्या पूर्वीही तेच परमात्मा होते. वस्तूंच्या शेवटीही तेच परमात्मा राहतील आणि वस्तूंच्या रूपातही तेच परमात्मा विद्यमान् आहेत.

उत्पत्ति-विनाशशील पदार्थांच्या संग्रह आणि सुख भोगाची इच्छा करणाऱ्यासाठी परमात्मा (तत्त्वतः जवळ असूनही) दूर आहेत. परंतु जे केवळ परमात्म्याच्याच सम्मुख आहेत, त्यांच्यासाठी परमात्मा जवळ आहेत. म्हणून साधकाने सांसारिक भोग आणि संग्रहाच्या इच्छेचा त्याग करून केवळ परमात्मप्राप्तीची अभिलाषा जागृत केली पाहिजे. परमात्मप्राप्तीची उत्कट अभिलाषा होताच परमात्मप्राप्ती होते अर्थात् परमात्म्याशी नित्ययोगाचा अनुभव येतो.

**सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयम्**—ते परमात्मा अत्यंत सूक्ष्म असल्याने इंद्रिय आणि अंतःकरणाचे विषय नाहीत अर्थात् ते परमात्मा त्यांच्या पकडीत येत नाहीत. आता एक प्रश्न उद्भवतो की, जर ते जाणले जात नाहीत, तर मग त्यांचा अभाव असेल. तर त्यांचा अभाव नाही. जसे परमाणुरूप पाणी सूक्ष्म असल्याने डोळ्याला दिसत नाही, परंतु न दिसले तरी त्याचा अभाव नाही. ते पाणी परमाणूरूपाने आकाशात राहते आणि स्थूल झाल्यावर थेंब, गारा इत्यादी रूपात दिसू लागते. त्याचप्रमाणे परमात्मा अत्यंत सूक्ष्म असल्याने इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादीद्वारा जाणण्यात येत नाहीत, कारण ते ह्यांच्या पलीकडे आहेत, अतीत आहेत.

जीवाच्या अज्ञानामुळेच ते परमात्मा जाणण्यात येत नाहीत. जसे एखाद्या ठिकाणी "**श्रीमद्भगवद्गीता**" शब्द लिहीलेला आहे. जो अशिक्षित आहे, त्याला तर केवळ काळ्या रेघाच दिसतात आणि जो सुशिक्षित आहे त्याला "**श्रीमद्भगवद्गीता**" दिसत असते. संस्कृत शिकलेल्यास हा शब्द कोण्या धातूने बनलेला आहे, याचा अर्थ काय होतो—हे दिसू लागते. गीतेचे मनन करणाऱ्याला गीतेचे सखोल भाव दिसू लागतात. त्याचप्रमाणे ज्या मनुष्यांना परमात्म-तत्त्वाचे ज्ञान नाही, त्यांना परमात्मा दिसत नाहीत, त्यांच्या जाणण्यात येत नाहीत. परंतु ज्यांना परमात्मतत्त्वाचे ज्ञान झाले आहे, त्यांना तर सर्व काही परमात्माच परमात्मा दिसत असतात.

त्या परमात्मतत्त्वाला "ज्ञेय" (१३।१२-१७) ही म्हटले आहे आणि "अविज्ञेय" ही म्हटले आहे. याचे तात्पर्य, तो स्वद्वाराच जाणला जाऊ शकतो, म्हणून तो "ज्ञेय" आहे आणि तो इंद्रिये-मन-बुद्धीद्वारा जाणला जाऊ शकत नाही, म्हणून तो "अविज्ञेय" आहे.

सर्वत्र परिपूर्ण असलेल्या परमात्म्याला जाणून घेण्यासाठी परमात्म्याला सर्वत्र परिपूर्ण असल्याचे मानणे आवश्यक आहे. असे मानणेही जाणण्यासारखेच आहे. जसे (बोध झाल्यावर) ज्ञानाला (जाणणे) कोणीच मिटवू शकत नाही, त्याचप्रमाणे "परमात्मा सर्वत्र परिपूर्ण आहेत" या मान्यतेला (मानणे) कोणी मिटवू शकत नाही. जर सांसारिक मान्यता—"मी ब्राह्मण आहे", "मी साधू आहे" इत्यादींना (जे अवास्तविक आहेत) कोणी मिटवू शकत नाही, तर पारमार्थिक मान्यता (ज्या वास्तविक आहेत) कोण मिटवू शकतो? तात्पर्य, दृढतापूर्वक मानणेही एक साधन आहे. जाणण्याप्रमाणे मानण्याचेही पुष्कळ महत्त्व आहे. "परमात्मा सर्वत्र परिपूर्ण आहेत" असे दृढतापूर्वक मानल्याने, मान्यता मान्यतारूपाने राहणार नाही, तर इंद्रिये-मन-बुद्धीच्या पलीकडे असलेले जे अत्यंत सूक्ष्म परमात्मा आहेत, त्यांचा अनुभव होईल.

**परिशिष्ट भाव**—परमात्म्याला बाराव्या श्लोकात 'ज्ञेय' म्हटले गेले आहे. परंतु या श्लोकात त्यांना 'अविज्ञेय' म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, परमात्मा ज्ञेय असूनही संसारासारखे ज्ञेय नाहीत. जसा संसार इद्रिये, मन, बुद्धीने जाणला जातो, तसे परमात्मा इन्द्रिये, मन, बुद्धीने जाणले जात नाहीत. इंद्रिये-मन-बुद्धी प्रकृतीचे कार्य आहे आणि परमात्मा प्रकृतीहून अतीत आहेत. प्रकृतीचे कार्य प्रकृतीलाही पूर्ण जाणू शकत नाही, तर मग प्रकृतीहून अतीत असलेल्या परमात्म्याला जाणूच कसे शकेल? परमात्म्याला

* पृथ्वीपासून दूर पाणी, पाण्यापासून दूर तेज, तेजापासून दूर वायू, वायूपासून दूर आकाश, आकाशापासून दूर महत्तत्त्व, महत्तत्त्वापासून दूर प्रकृती आणि प्रकृतीपासून दूर परमात्मा आहेत. अशा रीतीने दुराती दूर परमात्मा आहेत. दुराती दूर असूनही ते परमात्मा व्यापकरूपाने सर्वात आहेत, कारण परमात्मा सर्वांचे कारण आहेत आणि कारण सर्व कार्यात राहत असते.

प्रकृतीपेक्षा जवळ स्थूलशरीर, स्थूलशरीरापेक्षा जवळ सूक्ष्मशरीर, सूक्ष्म शरीरापेक्षा जवळ कारणशरीर, कारणशरीरापेक्षा जवळ अहम् आहे आणि अहम्पेक्षा जवळ परमात्मा आहेत. अशा प्रकारे जवळात जवळ परमात्मा आहेत. परमात्मा जितके जवळ आहेत तितके जवळ दुसरे कोणीही नाही.

तर मानून स्वीकार करावा लागतो, कारण स्वीकृती स्वयंने होते, करणाने (मन-बुद्धी-इन्द्रिये याने) नव्हे.* स्वयंचे परमात्म्याशी ऐक्य आहे. म्हणून परमात्म्याची प्राप्तीही स्वीकृतीने होते, चिंतन-मनन-वर्णन करण्याने नव्हे. शरीर-संसाराशी स्वयंचे ऐक्य कधी झाले नाही, आत्ता नाही, होणार नाही आणि होऊ शकतही नाही. परमात्म्यापासून स्वयं कधी वेगळा झाला नाही, आत्ता नाही, होणार नाही आणि होऊ शकतही नाही.

## अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम्।
## भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च॥ १६ ॥

**तत्** = ते (परमात्मा)
**अविभक्तम्, च** = (स्वयं) विभागरहित असूनही
**भूतेषु** = संपूर्ण प्राण्यांत
**विभक्तम् इव** = विभक्तासारखे
**स्थितम्** = स्थित आहेत
**च** = आणि
**ज्ञेयम्** = (ते) जाणण्यायोग्य (परमात्माच)
**प्रभविष्णु** = संपूर्ण प्राण्यांना उत्पन्न करणारे
**च** = तसेच
**भूतभर्तृ** = त्यांचे भरण-पोषण करणारे
**च** = आणि
**ग्रसिष्णु** = संहार करणारे आहेत.

*व्याख्या*— **अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम्**—ह्या त्रैलोक्यात पाहणे, ऐकणे आणि समजून घेण्यात जितके काही स्थावर-जंगम प्राणी येतात, त्या सर्वात परमात्मा स्वत: विभागरहित असूनही विभक्ताप्रमाणे प्रतीत होतात. विभाग केवळ प्रतीती आहे.

ज्याप्रमाणे आकाश घट, मठ इत्यादींच्या उपाधीने घटाकाश, मठाकाश इत्यादींच्या रूपात वेगवेगळे दिसत असूनही तत्त्वाने एकच आहे, त्याचप्रमाणे परमात्मा भिन्न-भिन्न प्राण्यांच्या शरीरांच्या उपाधीने वेगवेगळे दिसत असूनही तत्त्वाने एकच आहेत.

याच अध्यायाच्या सत्तावीसाव्या श्लोकात ''**समं सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरम्**'' पदांनी परमात्म्याला संपूर्ण प्राण्यांत समभावाने स्थित पाहण्यासाठी सांगितले गेले आहे. त्याच-प्रमाणे अठराव्या अध्यायाच्या वीसाव्या श्लोकात ''**अविभक्तं विभक्तेषु**'' पदांनी सात्त्विक ज्ञानाचे वर्णन करतानाही, परमात्म्याला अविभक्तरूपाने पाहणेच ''सात्त्विक ज्ञान'' म्हटले गेले आहे.

**भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च**—याच अध्यायाच्या दुसऱ्या श्लोकात ''**विद्धि**'' पदाने ज्या परमात्म्याला जाणून घेण्याविषयी म्हटले गेले आहे आणि बाराव्या श्लोकात ज्या ''ज्ञेय'' तत्त्वाचे वर्णन करण्याची प्रतिज्ञा केली गेली आहे, त्याचेच या ठिकाणी ब्रह्मा, विष्णू आणि महेशरूपाने वर्णन झाले आहे. वस्तुत: चेतन तत्त्व (परमात्मा) एकच आहे. तेच परमात्मा रजोगुणाची प्रधानता स्वीकार केल्यामुळे ब्रह्मारूपाने सर्वांना उत्पन्न करणारे, सत्त्वगुणाची प्रधानता स्वीकार केल्यामुळे विष्णुरूपाने सर्वांचे भरण-पोषण करणारे आणि तमोगुणाची प्रधानता स्वीकार केल्याने रुद्ररूपाने सर्वांचा संहार करणारे आहेत. तात्पर्य, एकच परमात्मा सृष्टी, पालन आणि संहार करीत असल्यामुळे ब्रह्मा, विष्णू आणि शिव नाव धारण करतात†. येथे हे समजून घेण्याची आवश्यकता आहे की, परमात्मा सृष्टि-रचनादी कार्यासाठी भिन्न-भिन्न गुणांचा स्वीकार करत असले तरी, त्या गुणांच्या वशीभूत होत नाहीत. गुणांवर त्यांचे पूर्ण अधिपत्य राहत असते.

**परिशिष्ट भाव**—या श्लोकात परमात्म्याच्या समग्ररूपाचे वर्णन झाले आहे. जसा संसार भौतिकदृष्टीने एक आहे, तसेच वास्तविक तत्त्वही (परमात्माही) एक आहे, अविभक्त आहे. परंतु जसा संसार पंचभौतिकदृष्टीने एक असूनही अनेक वस्तू, व्यक्ती (जड-चेतन, स्थावर-जंगम) इत्यादींच्या रूपात दिसतो, तसेच परमात्मा एक असूनही अनेकरूपात दिसतात. तात्पर्य हे आहे की, परमात्मा एक असूनही अनेक आहेत आणि अनेक असूनही एक आहेत. वास्तविक सत्ता कधी दोन होऊच शकत नाही. कारण दोन झाल्यास असत् येते.

उत्पन्न करणारेही परमात्मा आहेत आणि उत्पन्न होणारेही परमात्मा आहेत. भरण-पोषण करणारेही परमात्मा आहेत आणि ज्यांचे भरण-पोषण होते तेही परमात्मा आहेत. संहार करणारेही परमात्मा आहेत आणि ज्यांचा संहार होतो तेही परमात्मा आहेत.

---

* स्वीकृती स्वयं यात होते, म्हणून स्वीकृत केलेली गोष्ट विसरत नाही. जसे—'मी ब्राह्मण आहे', 'मी विवाहित आहे' इत्यादी. परंतु मन-बुद्धीत झालेल्या विचाराचे विस्मरण होते. स्वीकृत केलेल्या गोष्टीत कोणता संशयही राहत नाही आणि विपरीत भावनाही होत नाही.

† सृष्टिस्थित्यन्तकरणाद् ब्रह्माविष्णुशिवात्मक:।
स संज्ञां याति भगवानेक एव जनार्दन:॥ (पद्मपुराण सृष्टि २।११४)

*संबंध—पूर्व श्लोकात भगवंतांनी ज्ञेय तत्त्वाचे आधाररूपाने वर्णन केले, आता पुढील श्लोकात त्याचे प्रकाशकरूपाने वर्णन करीत आहेत.*

**ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते।**
**ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य विष्ठितम्॥ १७॥**

**तत्** = ते (परमात्मा)
**ज्योतिषाम् अपि** = संपूर्ण ज्योतींचीही
**ज्योतिः** = ज्योती (आणि)
**तमसः** = अज्ञानाच्या
**परम्** = अत्यंत पलीकडचे असे
**उच्यते** = म्हटले गेले आहेत.
**ज्ञानम्** = (ते) ज्ञानस्वरूपी,
**ज्ञेयम्** = जाणण्यायोग्य,
**ज्ञानगम्यम्** = ज्ञानाने प्राप्त करण्यायोग्य (आणि)
**सर्वस्य** = सर्वांच्या
**हृदि** = हृदयात
**विष्ठितम्** = विराजमान आहेत.

*व्याख्या*— **ज्योतिषामपि तज्ज्योतिः**—ज्योती म्हणजे प्रकाश (ज्ञान) अर्थात् ज्याच्यापासून प्रकाश मिळत असतो, ज्ञान होत असते त्या सर्व ज्योती आहेत. भौतिक पदार्थ हे सूर्य, चंद्र, नक्षत्र, तारे, अग्नी, विद्युत् इत्यादीच्या प्रकाशात दिसतात. म्हणून भौतिक पदार्थांची ज्योती (प्रकाशक) सूर्य, चंद्र इत्यादी आहेत.

वर्णात्मक आणि ध्वन्यात्मक शब्दांचे ज्ञान कानाने होत असते, म्हणून शब्दाची ज्योती (प्रकाशक) "**कान**" आहेत. शीत-उष्ण, कोमल-कठोर इत्यादीच्या स्पर्शाचे ज्ञान त्वचेने होते, म्हणून स्पर्शाची ज्योती (प्रकाशक) "**त्वचा**" आहे. श्वेत, नील, पीत इत्यादी रूपांचे ज्ञान डोळ्यांने होते, म्हणून रूपाची ज्योती (प्रकाशक) "**डोळे**" आहेत. आंबट, गोड, खारट इत्यादी रसाचे ज्ञान जिभेने होते, म्हणून रसाची ज्योती (प्रकाशक) "**जीभ**" आहे. सुगंध, दुर्गंधाचे ज्ञान नाकाने होते, म्हणून गंधाची ज्योती (प्रकाशक) "**नाक**" आहे. या पाचही इंद्रियांनी शब्दादी पाचही विषयाचे ज्ञान, जेव्हा इंद्रियांबरोबर मन राहते, तेव्हाच होत असते. जर त्यांच्याबरोबर मन नसेल तर, कोणत्याही विषयाचे ज्ञान होत नाही. म्हणून इंद्रियांची ज्योती (प्रकाशक) "**मन**" आहे. मनाने विषयाचे ज्ञान झाले तरी, जोपर्यंत बुद्धी मनाबरोबर नसते, तोपर्यंत त्या विषयाचे स्पष्ट आणि स्थायी ज्ञान होत नाही. बुद्धी बरोबर असल्यानेच त्या विषयाचे स्पष्ट आणि स्थायी ज्ञान होते, म्हणून मनाची ज्योती (प्रकाशक) "**बुद्धी**" आहे. बुद्धीने कर्तव्य-अकर्तव्य, सत्-असत्, नित्य-अनित्य यांचे ज्ञान झाले तरीही जर स्व (कर्ता) त्या ज्ञानाला धारण करत नसेल, तर ते बौद्धिक ज्ञानच राहून जाते. ते ज्ञान जीवनात, आचरणात येत नाही, ती गोष्ट स्व मध्ये उतरत नाही. जी गोष्ट स्व मध्ये उतरते, ती पुन्हा कधी जात नाही. म्हणून बुद्धीची ज्योती (प्रकाशक) "**स्व**" आहे. स्व सुद्धा परमात्म्याचा अंश आहे आणि परमात्मा अंशी आहे. स्व मध्ये ज्ञान, प्रकाश परमात्म्यापासूनच येतो. म्हणून स्व ची ज्योती (प्रकाशक) "**परमात्मा**" आहेत. त्या स्वयंप्रकाश असलेल्या परमात्म्याला कोणीही प्रकाशित करू शकत नाही.

तात्पर्य, परमात्म्याचा प्रकाश (ज्ञान) स्व मध्ये येतो. स्व चा प्रकाश बुद्धीत, बुद्धीचा प्रकाश मनात, मनाचा प्रकाश इंद्रियांत आणि इंद्रियांचा प्रकाश विषयांमध्ये येतो. मूळात या सर्वांमध्ये प्रकाश परमात्म्यापासूनच येतो. म्हणून या सर्व ज्योतींचा ज्योती, प्रकाशकांचा प्रकाशक परमात्माच आहेत*. जसे एकामागे एक बसलेले परिक्षार्थी आपल्यापेक्षा पुढे बसलेल्याला तर पाहू शकतात परंतु आपल्या मागे बसलेल्याला पाहू शकत नाहीत. त्याचप्रमाणे अहम्, बुद्धी, मन, इंद्रिये इत्यादीही आपल्यापेक्षा समोर असलेल्याला तर पाहू (जाणू) शकतात. परंतु आपल्या मागे असलेल्यांना नव्हे. जसे सर्वांच्या पाठीमागे बसलेला परिक्षार्थी आपल्या पुढे बसलेल्या संपूर्ण परिक्षार्थी यांना पाहू शकतो. त्याचप्रमाणे, परम प्रकाशक परमात्मा अहम्, बुद्धी, मन, इंद्रिये, इत्यादी सर्वांना पाहतो, प्रकाशित करतो परंतु त्याला कोणी प्रकाशित करू शकत नाही. तो परमात्मा संपूर्ण चराचर जगताचे समानरूपाने निरपेक्ष प्रकाशक आहे. **"यस्य भासा सर्वमिदं विभाति सचराचरम्"** (श्रीमद्भा० १०।१३।५५). तेथे प्रकाशक, प्रकाश आणि प्रकाश्य—ही त्रिपुटी नाही.

**तमसः परमुच्यते**—ते परमात्मा अज्ञानाच्या अत्यंत

* विषय करन सुर जीव समेता। सकल एक ते एक सचेता॥
सब कर परम प्रकासक जोई। राम अनादि अवधपति सोई॥ (मानस १।११७।३)
(२) जो ज्योतियोंका ज्योति है, सबसे प्रथम जो भासता। अव्यय सनातन दिव्य दीपक सर्व विश्व प्रकाशता॥

पलीकडे असलेले अर्थात् सर्वथा असंबद्ध आणि निर्लिप्त आहेत. इंद्रिये, मन, बुद्धी आणि अहम्—यामध्ये तर ज्ञान येत-जात राहते, परंतु जो सर्वांचा परम प्रकाशक आहे, त्या परमात्म्यात अज्ञान, कधी येतच नाही, येऊ शकतही नाही, आणि येणे संभवही नाही. जसे सूर्यात कधी अंधार येतच नाही, त्याचप्रमाणे त्या परमात्म्यात कधी अज्ञान येतच नाही. म्हणून त्या परमात्म्याला अज्ञानाच्या अत्यंत पलीकडे असलेले म्हटले गेले आहे.

**ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यम्**—त्या परमात्म्यात कधी अज्ञान येत नाही. तो स्वत: ज्ञानस्वरूप आहे आणि त्याच्यापासूनच सर्वांना प्रकाश मिळतो. म्हणून त्या परमात्म्याला "ज्ञान" अर्थात् "ज्ञानस्वरूप" म्हटले गेले आहे.

इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादीद्वाराही (जाणण्यात येणारे) विषयांचे ज्ञान होते, परंतु ते अवश्य जाणण्याला योग्य नाहीत, कारण त्यांना जाणून घेतल्यानंतरही जाणणे शिल्लक राहते, जाणून घेणे पूर्ण होत नाही. वास्तविक अवश्य जाणून घेण्याला योग्य तर एक परमात्माच आहेत—"**अवसि देखिअहिं देखन जोगू**" (मानस १।२२९।३). त्या परमात्म्याला जाणून घेतल्यानंतर आणखी काही जाणून घेणे शिल्लक राहत नाही. पंधराव्या अध्यायात भगवंतांनी आपल्यासाठी म्हटले आहे की, "संपूर्ण वेदांद्वारा जाणून घेण्याला योग्य मीच आहे" (१५।१५), "जो मला जाणून घेतो, तो सर्ववित् होतो". (१५।१९) म्हणून परमात्म्याला "ज्ञेय" म्हटले गेले आहे.

ज्ञानाद्वारा असत्‌चा त्याग झाल्यास परमात्म्याला तत्त्वाने जाणून घेतले जाऊ शकते. म्हणून त्या परमात्म्याला "ज्ञानगम्य" म्हटले गेले आहे.

**हृदि सर्वस्य विष्ठितम्**—तो परमात्मा सर्वांच्या हृदयात नित्य-निरंतर विद्यमान आहे. तात्पर्य, जरी तो परमात्मा सर्व देश, काळ, वस्तू, व्यक्ती, घटना, परिस्थिती, अवस्था इत्यादीत परिपूर्णरूपाने व्यापक आहे, तरीही त्याचे प्राप्ती-स्थान तर हृदयच आहे.

त्या परमात्म्याला आपल्या हृदयात अनुभव करण्याचा उपाय असा आहे—

(१) मनुष्य प्रत्येक विषयाला जाणून घेतो तर, त्या माहितीत सत् आणि असत् दोन्हीही असतात. या दोघांची विभागणी करण्यासाठी साधकाने हा अनुभव करावा की, माझ्या जागृत, स्वप्न, सुषुप्ती आणि बालपण, तारुण्य, म्हातारपण इत्यादी अवस्था तर वेगवेगळ्या झाल्या, परंतु मी तोच राहिलो. सुखदायी, दु:खदायी, अनुकूल, प्रतिकूल परिस्थिती आल्या आणि गेल्या, परंतु त्यात मी तोच राहिलो. देश, काळ, वस्तू, व्यक्ती इत्यादींचा संयोग-वियोग झाला परंतु त्यातही मी तोच राहिलो. तात्पर्य; अवस्था, परिस्थिती, संयोग-वियोग तर भिन्न-भिन्न (वेग-वेगळे) झाले, परंतु त्या सर्वांत जो तोच राहिला, वेग-वेगळा झाला नाही त्याचा (त्या सर्वाहून वेगळे करून) अनुभव करावा. असे करण्याने जो सर्वांच्या हृदयात विराजमान आहे, त्याचा अनुभव होईल, कारण तो स्वत: परमात्म्याशी अभिन्न आहे.

(२) जसे अत्यंत भुकेला अन्नाविना आणि अत्यंत तहानलेला पाण्याविना राहू शकत नाही, तसेच त्या परमात्म्याविना राहणे अशक्य व्हावे. चैन पडू नये. त्याच्याविना भूक लागू नये, तहान लागू नये आणि झोप येऊ नये. त्या परमात्म्याशिवाय इतरांकडे वृत्ती जाऊच नये. अशा रीताने परमात्मप्राप्तीसाठी व्याकूळता झाल्यास आपल्या हृदयात त्या परमात्म्याचा अनुभव होईल.

अशा रीतीने एकदा हृदयात परमात्म्याचा अनुभव झाल्यास, साधकाला "सर्वत्र परमात्माच आहे" असा अनुभव होतो, हाच वास्तविक अनुभव आहे.

**परिशिष्ट भाव**—बाराव्यापासून सतराव्या श्लोकापर्यंत ज्या ज्ञेय तत्त्वाचे वर्णन झाले आहे, ते भगवंताचे समग्ररूपच (**'वासुदेव: सर्वम्' च**) आहे. कारण यात निर्गुण-निराकार, (बारावा श्लोक), सगुण-निराकार (तेरावा श्लोक) आणि सगुण-साकार (सोळावा श्लोक)—तिन्ही रूपांचे वर्णन झाले आहे.

**'ज्ञानगम्यम्'**—परमात्मा तत्त्वज्ञानानेच जाणले जातात, क्रिया, वस्तू इत्यादीने नव्हे. तत्त्वज्ञानाशिवाय त्यांना जाणण्याचे दुसरे कोणतेही साधन नाही. मनुष्य कर्मयोग, ज्ञानयोग, ध्यानयोग इत्यादी ज्या साधनाने परमात्म्याला जाणेल, वास्तविक तत्त्वज्ञानानेच जाणेल. श्रद्धा, भक्ती, विश्वास, भगवत्कृपा इत्यादीनेही जाणेल तर तत्त्वज्ञानानेच जाणेल. कारण जाणणे ज्ञानानेच होते.

येथे '**ज्ञानगम्यम्**' पदाचा अर्थ 'साधन-समुदायाने प्राप्त होण्यायोग्य' असाही घेतला जाऊ शकतो, ज्याचे वर्णन याच अध्यायाच्या सातव्यापासून अकराव्या श्लोकापर्यंत झाले आहे.

***संबंध**—पहिल्या श्लोकापासून सतराव्या श्लोकापर्यंत क्षेत्र, ज्ञान आणि ज्ञेयाचे जे वर्णन झाले आहे, आता पुढील श्लोकात फलासह त्याचा उपसंहार करतात.*

**इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं समासतः।**
**मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावायोपपद्यते॥ १८॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **इति** | = अशाप्रकारे | **ज्ञेयम्** | = ज्ञेय यांना | **एतत्** | = हे |
| **क्षेत्रम्** | = क्षेत्र | **समासतः** | = संक्षेपाने | **विज्ञाय** | = तत्त्वाने जाणून |
| **तथा** | = तसेच | **उक्तम्** | = सांगितले गेले आहे. | **मद्भावाय** | = माझ्या भावाला |
| **ज्ञानम्** | = ज्ञान | | | | |
| **च** | = आणि | **मद्भक्तः** | = माझा भक्त | **उपपद्यते** | = प्राप्त होतो. |

*व्याख्या*—**इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं समासतः**—याच अध्यायाच्या पाचव्या आणि सहाव्या श्लोकांत ज्याचे वर्णन केले गेले आहे, ते "क्षेत्र" आहे. सातव्यापासून अकराव्या श्लोकापर्यंत ज्या साधनसमुदायाचे वर्णन केले गेले आहे, ते "ज्ञान" आहे आणि बाराव्यापासून सतराव्या श्लोकापर्यंत ज्याचे वर्णन केले गेले आहे, ते "ज्ञेय" आहे. अशा प्रकारे मी क्षेत्र, ज्ञान आणि ज्ञेयाचे संक्षेपाने वर्णन केले आहे.

**मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावायोपपद्यते**—माझा भक्त क्षेत्र, साधनसमुदायरूपी ज्ञान, आणि ज्ञेय तत्त्व (परमात्मा) यांना तत्त्वाने जाणून घेऊन, माझ्या भावाला प्राप्त होतो.

क्षेत्राला योग्य रीतीने जाणून घेतल्यावर, क्षेत्राशी संबंध-विच्छेद होतो. ज्ञानाला अर्थात् साधनसमुदायाला योग्य रीतीने जाणल्याने, (जाणून घेतल्याने), आत्मसात केल्याने देहाभिमान (व्यक्तित्व) समाप्त होतो. ज्ञेय तत्त्वाला योग्य रीतीने जाणून घेतल्यावर, त्याची प्राप्ती होते अर्थात् परमात्मतत्त्वाशी अभिन्नतेचा अनुभव होतो.

**परिशिष्ट भाव**—येथे '**मद्भक्त एतद्विज्ञाय**' पदांचे तात्पर्य हे आहे की, समग्र परमात्म्याचे ज्ञान भक्तीनेच होऊ शकते.* म्हणून साधकाने भक्त व्हावे.

या श्लोकात आलेल्या '**मद्भावायोपपद्यते**' पदाला गीतेत अनेक प्रकाराने सांगितले गेले आहे. जसे—'**मद्भावमागताः**' (४। १०), '**मम साधर्म्य मागताः**' (१४। २), '**मद्भावं सोऽधिगच्छति**' (१४। १९). मद्भावाचा अर्थ आहे—मज परमात्म्याची सत्ता. असा सिद्धांत आहे की, सत्ता एकच असते, दोन नव्हे. भगवंताने गीतेत ज्ञान आणि भक्ती—दोन्हीतही आपल्या भावाची प्राप्ती सांगितली आहे. 'ज्ञान' यात याचे तात्पर्य हे आहे—ब्रह्माशी साधर्म्य होणे अर्थात् जसे ब्रह्म सत्-चित्-आनंदरूप आहे, तसेच ज्ञानी महापुरुषाचेही सत्-चित्-आनंदरूप होणे. 'भक्ती' यात याचे तात्पर्य हे आहे—भक्ताची भगवंताशी आत्मीयता अर्थात् अभिन्नता होणे.

***संबंध***—*याच अध्यायाच्या पहिल्या आणि दुसऱ्या श्लोकांत ज्या क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाचे संक्षेपाने वर्णन केले होते, त्याचेच विस्ताराने वर्णन करण्यासाठी पुढील प्रकरण आरंभ करतात.*

**प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि।**
**विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसम्भवान्॥ १९॥**
**कार्यकरणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते।**
**पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते॥ २०॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **प्रकृतिम्** | = प्रकृती | **च** | = आणि | **विद्धि** | = समज. |
| **च** | = आणि | **विकारान्** | = विकारांना | **कार्यकारण-कर्तृत्वे** | = कार्य आणि करणाद्वारा होणाऱ्या क्रिया उत्पन्न करण्यात |
| **पुरुषम्** | = पुरुष ह्या | **च** | = आणि | | |
| **उभौ एव** | = दोघांनाही (तू) | **गुणान्, अपि** | = गुणांनाही | | |
| **अनादी** | = अनादी | **प्रकृतिसम्भवान्, एव** | = प्रकृतीपासूनच उत्पन्न होणारे | **प्रकृतिः** | = प्रकृती |
| **विद्धि** | = समज | | | **हेतुः** | = कारण |

* प्रेम भगति जल बिनु रघुराई। अभिअंतर मल कबहुँ न जाई॥ (मानस उत्तर० ४९। ३)

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **उच्यते** | = म्हटली जाते (आणि) | **भोक्तृत्वे** | = भोक्तेपणात | **हेतुः** | = कारण |
| **सुखदुःखानाम्** | = सुख-दुःखाच्या | **पुरुषः** | = पुरुष | **उच्यते** | = म्हटला जातो. |

*व्याख्या*— [याच अध्यायाच्या तीसऱ्या श्लोकात भगवंतांनी क्षेत्राच्या विषयात "**यच्च**" (जे आहे) "**यादृक्च**" (जसे आहे), "**यद्विकारि**" (ज्या विकाराचे आहे) आणि "**यतश्चयत्**" (ज्याच्यापासून जे उत्पन्न झाले आहे) ह्या चार गोष्टी ऐकण्याची आज्ञा केली होती. त्यापैकी "**यच्च**" याचे वर्णन पाचव्या श्लोकात आणि "**यद्विकारि**" चे वर्णन सहाव्या श्लोकात केले. "**यादृक्च**" चे वर्णन पुढे याच अध्यायाच्या सव्वीसाव्या-सत्तावीसाव्या श्लोकांत करतील. आता "**यतश्च यत्**" चे वर्णन करताना प्रकृतीपासून विकार आणि गुण उत्पन्न होतात, असे सांगत आहेत. यातही जर पाहिले तर, विकारांचे वर्णन पूर्वी सहाव्या श्लोकात "**इच्छा-द्वेषः**" इत्यादी पदांनी केलेलेच आहे. येथे गुण प्रकृतीपासून उत्पन्न होतात—ही गोष्ट नवीन सांगितली आहे.

बाराव्यापासून अठराव्या श्लोकापर्यंत "ज्ञेय तत्त्वा" चे (परमात्मा) वर्णन आहे आणि येथे एकोणीसाव्यापासून चौतीसाव्या श्लोकापर्यंत "पुरुषा" चे (क्षेत्रज्ञ) वर्णन आहे. तेथे तर ज्ञेय तत्त्वाच्या अंतर्गतच सर्व काही आहे आणि येथे "पुरुषा" च्या अंतर्गत सर्व काही आहे. अर्थात् तेथे ज्ञेय तत्त्वाच्या अंतर्गत पुरुष आहे आणि येथे पुरुषाच्या अंतर्गत ज्ञेय तत्त्व आहे. तात्पर्य, ज्ञेय तत्त्व (परमात्मा) आणि पुरुष (क्षेत्रज्ञ) दोन्ही तत्त्वाने दोन नाहीत, तर एकच आहेत]

**प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि**—येथे "**प्रकृतिम्**" पद संपूर्ण क्षेत्राचे (जगत्) कारणरूप मूळ प्रकृतीचे वाचक आहे. सात प्रकृती-विकृती (पंच महाभूत, अहंकार आणि महत्तत्त्व) तसेच सोळा विकृती (दहा इंद्रिये, मन आणि पाच विषय) ही सर्वच प्रकृतीची कार्य आहेत आणि प्रकृती या सर्वांचे मूळ कारण आहे.

"**पुरुषम्**" पद येथे क्षेत्रज्ञाचा वाचक आहे, ज्याला याच अध्यायाच्या पहिल्या श्लोकात क्षेत्राला जाणणारा म्हटले गेले आहे.

प्रकृती आणि पुरुष—दोघांना अनादी म्हणण्याचे तात्पर्य, जसे परमात्म्याचा अंश हा पुरुष (जीवात्मा) अनादी आहे, त्याचप्रमाणे ही प्रकृतीही अनादी आहे. या दोघांच्या अनादीपणात फरक नाही; परंतु दोघांच्या स्वरूपात फरक आहे. जसे प्रकृती गुणयुक्त आहे आणि पुरुष संपूर्णपणे गुणरहित आहे. प्रकृतीत विकार होतात आणि पुरुषात विकार होत नाहीत. प्रकृती जगताची कारण बनते आणि पुरुष कोणाचेही कारण होत नाही. प्रकृतीत कार्य आणि कारणभाव आहे आणि पुरुष कार्य आणि कारणभावाने रहित आहे.

**उभौ एव**—हे म्हणण्याचे तात्पर्य, प्रकृती आणि पुरुष दोन्ही वेगवेगळे आहेत. म्हणून जसे प्रकृती आणि पुरुष अनादी आहेत, तसेच त्या दोघांचा हा भेदसुद्धा (विवेक) अनादी आहे.

याच अध्यायाच्या पहिल्या श्लोकात आलेले "**इदं शरीरं क्षेत्रम्**" पदांनी मनुष्यशरीराकडेच दृष्टी जाते अर्थात् व्यष्टी मनुष्यशरीराचाच बोध होतो आणि "**क्षेत्रज्ञः**" पदाने मनुष्य शरीराला जाणणाऱ्या व्यष्टी क्षेत्रज्ञाचाच बोध होतो. म्हणून प्रकृती आणि तिच्या सर्व कार्यांचा बोध करविण्यासाठी येथे "**प्रकृतिम्**" पदाचा आणि संपूर्ण क्षेत्रज्ञांचा बोध करविण्यासाठी येथे "**पुरुषम्**" पदाचा प्रयोग केला गेला आहे.

याच अध्यायाच्या दुसऱ्या श्लोकात क्षेत्रज्ञाची परमात्म्याशी एकता जाणून घेण्यासाठी "**विद्धि**" पदाचा प्रयोग केला होता आणि येथे पुरुषाची प्रकृतीहून भिन्नता जाणण्यासाठी, "**विद्धि**" पदाचा प्रयोग केला गेला आहे. तात्पर्य, मनुष्य स्व ला आणि शरीराला एक समजतो म्हणून भगवान् येथे "**विद्धि**" पदाने अर्जुनाला ही आज्ञा करत आहेत की, हे दोन्ही वेग-वेगळे आहेत, या गोष्टीला तू योग्य रीतीने समजून घे.

**विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसम्भवान्**—इच्छा, द्वेष, सुख, दुःख, संघात, चेतना आणि धृती—या सात विकारांना तसेच सत्त्व, रज आणि तम—या तीन गुणांना प्रकृतीपासून उत्पन्न होणारे समज. याचे तात्पर्य, पुरुषात गुण आणि विकार नाहीत.

सातव्या अध्यायामध्ये बाराव्या श्लोकात तर भगवंतांनी गुण आपल्यापासून उत्पन्न होतात असे सांगितले आहे आणि येथे गुण प्रकृतीपासून उत्पन्न होतात असे सांगतात. याचे तात्पर्य, तेथे भक्तीचे प्रकरण असल्याने भगवंतांनी गुण आपल्यापासून उत्पन्न होतात असे म्हटले आणि गुणमयी मायेतून तरून जाण्यासाठी आपली शरणागती सांगितली आहे. परंतु येथे ज्ञानाचे प्रकरण असल्यामुळे, गुण प्रकृतीपासून उत्पन्न होत असल्याचे सांगितले. म्हणून साधक आपला गुणांशी संबंध न मानल्यानेच गुणांपासून सुटू शकतात.

**कार्यकरणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते**—आकाश, वायू, अग्नी, जल आणि पृथ्वी तसेच शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध या दहाचे (महाभूत आणि विषय) नाव "कार्य" आहे. श्रोत्र, त्वचा, नेत्र, रसना आणि घ्राण, वाणी, हस्त, पाद, उपस्थ

आणि गुदा, तसेच मन, बुद्धी आणि अहंकार—या तेराचे (बहि:-करण आणि अंत:करण) नाव ''करण'' आहे. या सर्वांकडून ज्या काही क्रिया होतात, त्यांच्या उत्पत्तीला प्रकृतीच हेतू आहे.

जे उत्पन्न होते ते ''कार्य'' म्हणविले जाते आणि ज्याच्याद्वारा कार्याची सिद्धी होते, ते ''करण'' म्हणविले जाते, अर्थात क्रिया करण्याची जितकी अवजारे (साधन) आहेत ती सर्व ''करण'' म्हणविली जातात. करण तीन प्रकारचे असतात (१) कर्मेंद्रिये, (२) ज्ञानेंद्रिये, (३) मन, बुद्धी आणि अहंकार. कर्मेंद्रिये स्थूल आहेत, ज्ञानेंद्रिये सूक्ष्म आहेत आणि मन, बुद्धी आणि अहंकार अत्यंत सूक्ष्म आहेत. कर्मेंद्रिये आणि ज्ञानेंद्रिये यांना ''बहि:-करण'' म्हणतात, तसेच मन, बुद्धी, अहंकार यांना ''अन्त:-करण'' म्हणतात. ज्यापासून क्रिया होतात, ते कर्मेंद्रिये आहेत. कर्मेंद्रिये आणि ज्ञानेंद्रियावर जे शासन करतात, ते मन, बुद्धी, अहंकार आहेत. तात्पर्य, कर्मेंद्रियावर ज्ञानेंद्रियांचे शासन आहे. ज्ञानेंद्रियावर मनाचे शासन आहे, मनावर बुद्धीचे शासन आहे आणि बुद्धीवर अहंकाराचे शासन आहे. मन, बुद्धी, अहंकाराविना कर्मेंद्रिये आणि ज्ञानेंद्रिये काम करत नाहीत. ज्ञानेंद्रियांशी जेव्हा मनाचा संबंध होतो, तेव्हा विषयाचे ज्ञान होते. मनाने ज्या विषयाचे ज्ञान होते, त्या विषयांपैकी कोणता विषय ग्राह्य आहे आणि कोणता त्याज्य आहे, कोणता विषय योग्य आहे आणि कोणता अयोग्य आहे, याचा निर्णय बुद्धी करते. बुद्धीच्याद्वारा निर्णित विषयावर अहंकार शासन करतो.

अहंकार दोन प्रकारचा असतो (१) अहंवृत्ती (२) अहंकर्ता. अहंवृत्ती कोणासाठी कधीही दोषी नसते, परंतु त्या अहंवृत्तीशी जेव्हा स्व (पुरुष) आपला संबंध जोडतो, तादात्म्य करून घेतो, तेव्हा तो अहंकर्ता होतो. तात्पर्य, अहंवृत्तीने मोहित होऊन, त्याच्या परवश होऊन स्व त्या अहंवृत्तीमध्ये आपली स्थिती मानतो, तेव्हा तो कर्ता होतो-''**अहङ्कारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते**'' (३।२७)

प्रकृतीचे कार्य बुद्धी (महत्तत्त्व) आहे आणि बुद्धीचे कार्य अहंवृत्ती (अहंकार) आहे. ही अहंवृत्ती बुद्धीचे कार्य तर आहे, परंतु हिच्याशी तादात्म्य करून स्व बुद्धीचा मालक बनतो अर्थात् कर्ता आणि भोक्ता बनतो. ''**पुरुष: प्रकृतिस्थो हि भुङ्क्ते प्रकृतिजान्गुणान्**'' (१३।२१) परंतु जेव्हा तत्त्वाचा बोध होतो., तेव्हा स्व कर्ताही बनत नाही आणि भोक्ताही बनत नाही—''**शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते**'' (१३।३१), मग कर्तृत्व-भोक्तृत्वरहित पुरुषाच्या शरीराकडून ज्या काही क्रिया होतात, त्या सर्व क्रिया अहंवृत्तीनेच होतात. याच अहंवृत्तीकडून होणाऱ्या क्रियांना गीतेमध्ये कित्येक प्रकाराने सांगितले गेले आहे. जसे प्रकृतीद्वाराच सर्व क्रिया होतात (१३।२९). प्रकृतीच्या गुणांद्वाराच सर्व क्रिया होतात (३।२७), गुणच गुणांत वर्तन करीत आहे. (३।२८), गुणांशिवाय दुसरा कोणी कर्ता नाही (१४।१९), इंद्रियेच आपापल्या विषयात वर्तन करीत आहेत (५।९) इत्यादी. तात्पर्य, बहि:करण आणि अंत:करणद्वारा ज्या क्रिया होतात, त्या सर्व प्रकृतीपासूनच होतात.

**पुरुष: सुखदु:खानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते**—अनुकूल परिस्थिती प्राप्त झाली असता सुखी (खूश) होणे हा सुखाचा भोग आहे आणि प्रतिकूल परिस्थिती प्राप्त झाली असता दु:खी (नाखूश) होणे हा दु:खाचा भोग आहे. हा सुख-दु:खाचा भोग पुरुषातच (चेतन) होतो, प्रकृतीमध्ये (जड) होत नाही, कारण जड प्रकृतीमध्ये सुखी-दु:खी होण्याचे सामर्थ्य नाही. म्हणून सुख-दु:खाच्या भोक्तेपणामध्ये पुरुष हेतू म्हटला गेला आहे. जर पुरुष अनुकूल-प्रतिकूल परिस्थितीशी मिसळून खूश-नाखूश झाला नाही तर, तो सुख-दु:खाचा भोक्ता बनू शकणार नाही.

सातव्या अध्यायाच्या चौथ्या-पाचव्या श्लोकांत भगवंतांनी अपरा (जड) आणि परा (चेतन) नावाने आपल्या दोन प्रकृतीचे वर्णन केले आहे. ह्या दोन्ही प्रकृती भगवंताचा स्वभाव आहे, म्हणून ह्या दोन्ही स्वत:हूनच भगवंताकडे जात आहेत. परंतु परा प्रकृती (चेतन), जो परमात्याचा अंश आहे आणि ज्याची स्वाभाविक आवड परमात्म्याकडे जाण्याचीच असते, तात्काळिक सुखभोगात आकर्षित होऊन अपरा-प्रकृतीशी (जडा) तादात्म्य करते. एवढेच नव्हे, तर प्रकृतीशी तादात्म्य करून ती ''प्रकृतिस्थ पुरुष'' च्या रूपांत आपली एक स्वतंत्र सत्ता निर्माण करते (१३।२१) ज्याला ''अहम्'' म्हणतात. ह्या ''अहम्'' मध्ये जड आणि चेतन दोन्ही आहेत. सुख-दु:खरूपी जो विकार होत असतो, तो जड अंशामध्येच होत असतो. परंतु जडाशी तादात्म्य झाल्याकारणाने त्याचा परिणाम ज्ञाता चेतनावर होतो अर्थात् जडाच्या संबंधाने सुख-दु:खरूपी विकारांना चेतन आपल्यात मानतो की, ''मी सुखी आहे'', ''मी दु:खी आहे''. जसे तोटा दुकानात होतो, पण दुकानदार म्हणतो की, मला तोटा आला. ज्वर शरीरात येतो परंतु तो असे मानतो की, मला ज्वर आला आहे. स्व मध्ये कधी ज्वर येत नाही,* जर

* आत्मानं चेद् विजानीयादयमस्मीति पूरुष:। किमिच्छन् कस्य कामाय शरीरमनुसंज्वरेत्। (बृहदारण्यक ४।४।१२)

''जर पुरुषाने आत्म्याला ''मी हाच आहे'' अशा प्रकारे विशेषरूपाने जाणून घेतले तर, मग तो कोणत्या इच्छेने अथवा कोणत्या कामनेने शरीराच्या ज्वराने (तापाने) अनुतप्त होईल?

आला असता तर कधी समाप्त झाला नसता.

सुख-दु:खाचा परिणाम चेतनावर होत असतो, म्हणून-च तर तो सुख-दु:खापासून मुक्त होऊ इच्छितो. जर तो सुख-दु:खी झाला नसता तर, त्याला मुक्त होण्याची इच्छा होऊच शकत नव्हती. मुक्तीची इच्छा जडाच्या संबंधानेच होत असते, कारण जडाचा स्वीकार केल्यानेच बंधन झाले आहे. जो आपल्याला सुखी-दु:खी मानतो, तोच सुख-दु:खरूपी विकारापासून आपली मुक्ती इच्छितो आणि त्याचीच मुक्ती होते. तात्पर्य, तादात्म्यामुळे झालेल्या मुक्तीच्या (कल्याण) इच्छेत चेतनाची मुख्यता आणि भोगांच्या इच्छेत जडाची मुख्यता असते, म्हणून शेवटी कल्याणाचा भागीदार चेतनच होतो, जड नव्हे.

संपूर्ण विकृती जडातच होत असते, चेतनात नव्हे. म्हणून वास्तविक सुखी-दु:खी "होणे" चेतनाचा धर्म नाही तर जडाच्या संगाने आपल्याला सुखी-दु:खी "मानणे" ज्ञात्या चेतनाचा स्वभाव आहे. तात्पर्य, चेतन सुखी-दु:खी होत नाही, तर (सुखाकार दु:खाकार वृत्तीशी मिसळून) स्वत:ला सुखी-दु:खी समजतो. चेतनामध्ये परस्पर विरुद्ध सुख-दु:खरूपी दोन भाव होऊच कसे शकतात? दोन रूपे परिवर्तनशील प्रकृतितच होत असतात. जे परिवर्तनशील नाही, त्याची दोन रूपे होऊ शकत नाहीत. तात्पर्य, सर्व विकार परिवर्तनशीलातच होऊ शकतात. चेतन स्वत: जसेच्या तसे राहत असूनही, परिवर्तनशील प्रकृतीच्या संगाने त्याच्या विकारांना आपल्यात आरोपित करत राहतो. हा सर्वांचा अनुभवसुद्धा आहे की, आपण सुखात एक आणि दु:खात दुसरे होत नाहीत. सुख आणि दु:ख दोन्ही वेग-वेगळे आहेत पण आपण एकच राहतो, म्हणूनच कधी सुखी होतो आणि कधी दु:खी होतो.

**परिशिष्ट भाव**—भगवान् क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाच्या विभागालाच प्रकृती आणि पुरुष या नावाने पुन्हा वर्णन करतात. क्षेत्र-क्षेत्रज्ञ व्यष्टी आहेत आणि प्रकृती-पुरुष समष्टी आहेत.

एक प्रकृती विभाग आहे आणि एक पुरुष विभाग आहे. शरीर आणि संसार प्रकृती विभागात आहेत आणि आत्मा व परमात्मा पुरुष विभागात आहेत. जसे प्रकृती आणि पुरुष अनादी आहेत, तसेच या दोन्हींच्या फरकाचे ज्ञान अर्थात् विवेकही अनादी आहे. म्हणून विवेकदृष्टीने पाहिले तर हे दोन्ही विभाग एक दुसऱ्याशी बिलकुल असम्बद्ध आहेत अर्थात् दोन्हीत किंचिन्मात्रही कोणता संबंध नाही. प्रकृती तर असत्, जड आणि दु:खरूप आहे आणि पुरुष सत्, चित् आणि आनंदरूप आहे. प्रकृती नाशवान्, विकारी आणि क्रियशील आहे आणि पुरुष अविनाशी, निर्विकार तसेच अक्रिय आहे. प्रकृतीची नित्यनिवृत्ती आहे आणि पुरुषाची नित्यप्राप्ती आहे. गीतेच्या आरंभीही भगवंताने याच विभागाचे वर्णन शरीर आणि शरीरी, देह आणि देही, सत् आणि असत् इत्यादी नावाने केले आहे.* म्हणून हा विभाग योग्य रीतीने समजणे प्रत्येक साधकासाठी अत्यंत आवश्यक आणि शीघ्र बोध करणारा आहे. कारण शरीर आणि शरीरीला एक मानणेच बंधन आहे आणि या दोहोंना वेग-वेगळे अनुभव करणे हीच मुक्ती आहे.

भगवान् शक्तिमान् आहेत आणि प्रकृती त्यांची शक्ती आहे.† ज्ञानाच्या दृष्टीने शक्ती आणि शक्तिमान्—दोन्ही वेग-वेगळे आहेत. कारण शक्तीत तर परिवर्तन (घट-वाढ) होते, परंतु शक्तिमान् जसाच्या तसा राहतो. परंतु भक्तीच्या दृष्टीने शक्ती आणि शक्तिमान—दोन्ही अभिन्न आहेत. कारण शक्तिमानापासून शक्तीला वेगळे करू शकत नाही अर्थात् शक्तिमानाविना शक्तीची स्वतंत्र सत्ता नाही. ज्ञान आणि भक्ती—दोन्हींचे तत्त्व सुरक्षित ठेवण्यासाठीच भगवंताने प्रकृतीला अनंतही म्हटले नाही आणि सांतही म्हटले नाही तर 'अनादी' म्हटले आहे. कारण जर प्रकृतीला अनंत (नित्य) म्हटले तर ज्ञानाचे खंडन होईल, कारण ज्ञानाच्या दृष्टीने प्रकृतीला सत्ताच नाही—**'नासतो विद्यते भाव:'** (गीता २। १६). जर प्रकृतीला सांत (अनित्य) म्हटले तर भक्तीचे खंडन होईल, कारण भक्तीच्या दृष्टीने प्रकृती भगवंताची शक्ती असल्याने भगवंताशी अभिन्न आहे—**'सदसच्चाहम्'** (गीता ९। १९). वास्तविक दृष्टीने पाहिले तर प्रकृती आणि पुरुषाचा स्वभाव वेग-वेगळा असूनही दोन्ही परस्पर अभिन्नही आहेत.

वास्तविक परमात्म्याचे स्वरूप 'समग्र' आहे. परमात्म्यात कोणती शक्ती नाही—असे संभवतच नाही. जर परमात्म्याला पूर्णपणे शक्तिरहित मानले तर परमात्मा एकदेशीय सिद्ध होतील. त्यांच्यात शक्तीचे परिवर्तन अथवा अदर्शन तर होऊ शकते, परंतु शक्तीचा अभाव होऊ शकत नाही. शक्ती कारणरूपाने त्यांच्यात राहतेच, नाहीतर परमात्म्याशिवाय शक्तीच्या (प्रकृतीच्या) राहण्याचे स्थान कोठे राहील? म्हणून येथे प्रकृती आणि पुरुष या दोघांना 'अनादी' म्हटले गेले आहे.

---

* पुरुष अहम्‌चा स्वीकार करण्याने जीव, क्षेत्रज्ञ, शरीरी, देही इत्यादी नावाने म्हटला जातो.

† 'मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम्' (श्वेताश्वतर० ४। १०)

*संबंध—पूर्व श्लोकात भगवंतांनी पुरुषाला सुख-दु:खाच्या भोगण्यात हेतू म्हटले. यावर प्रश्न होतो की, कोणता पुरुष सुख-दु:खाचा भोक्ता बनतो? याचे उत्तर आता भगवान् पुढील श्लोकात देत आहेत.*

**पुरुषः प्रकृतिस्थो हि भुङ्क्ते प्रकृतिजान्गुणान्।**
**कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु॥ २१॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **प्रकृतिस्थः** | = प्रकृतीत स्थित असलेला | **प्रकृतिजान्** | = प्रकृतिजन्य | **अस्य** | = त्याच्या |
| **पुरुषः** | = पुरुष (जीव) | **गुणान्** | = गुणांचा | **सदसद्योनिजन्मसु** | = उच्च-नीच योनीत जन्म घेण्याला |
| **हि** | = हाच | **भुङ्क्ते** | = भोक्ता बनतो (आणि) | **कारणम्** | = कारण बनतो. |
| | | **गुणसङ्गः** | = गुणांचा संग (हाच) | | |

*व्याख्या*—**पुरुषः प्रकृतिस्थो* हि भुङ्क्ते प्रकृतिजान्गुणान्**—वास्तविक पुरुष प्रकृतीमध्ये (शरीर) स्थित नसतोच. परंतु जेव्हा तो प्रकृतीशी (शरीर) तादात्म्य करून शरीराला ''मी'' आणि ''माझे'' मानतो, तेव्हा तो प्रकृतीत स्थित आहे असे म्हटले जाते. असा प्रकृतिस्थ पुरुषच (गुणांद्वारा रचलेल्या अनुकूल-प्रतिकूल परिस्थितीला सुखदायी-दु:खदायी मानून) अनुकूल परिस्थिती आली असता सुखी होतो आणि प्रतिकूल परिस्थिती आली असता दु:खी होतो. हेच पुरुषाचे प्रकृतिजन्य गुणांचा भोक्ता बनणे आहे.

जसे मोटार अपघातात मोटार आणि चालक दोघांचा हात असतो. क्रिया होण्यात तर केवळ मोटारीचीच प्रधानता राहते परंतु अपघाताचे फल (दंड) मोटारीशी आपला संबंध जोडणाऱ्या चालकालाच (कर्ता) भोगावा लागतो. त्याच प्रमाणे सांसारिक कार्य करण्यात प्रकृती आणि पुरुष दोघांचा हात असतो. क्रियांच्या होण्यात तर केवळ शरीराचीच प्रधानता असते, परंतु सुख-दु:खरूपी फल शरीराशी आपला संबंध जोडणाऱ्या पुरुषालाच (कर्ता) भोगावे लागते. जर त्याने आपला संबंध शरीराशी जोडला नाही आणि संपूर्ण क्रियांना प्रकृतीकडूनच होत असलेल्या मानले (१३।२९) तर, तो त्या क्रियांचे फल भोगणारा, बनणार नाही.

**कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु**—ज्या योनीत सुखाचे बाहुल्य असते, त्यांना ''सत्-योनी'' म्हणतात आणि ज्या योनीत दु:खाचे बाहुल्य असते, त्यांना ''असत्-योनी'' म्हणतात. पुरुषाच्या सत्-असत् योनीत जन्म होण्याला कारण गुणांचा संगच आहे.

सत्त्व, रज आणि तम—हे तिन्ही गुण प्रकृतीपासून उत्पन्न होतात. या तिन्ही गुणांपासूनच संपूर्ण पदार्थ आणि क्रियांची उत्पत्ती होत असते. प्रकृतिस्थ पुरुष जेव्हा या गुणांशी आपला संबंध समजतो, तेव्हा हे गुण त्याच्या उच्च-नीच योनीत जन्म होण्याला कारण बनतात.

प्रकृतीमध्ये स्थित झाल्यामुळेच पुरुष प्रकृतिजन्य गुणांचा भोक्ता बनतो आणि हा गुणांचा संग, आसक्ती, प्रियताच पुरुषाला उच्च-नीच योनीत घालण्याला कारण बनते. जर हा प्रकृतिस्थ झाला नाही, जर ह्याने प्रकृतीविषयी (शरीर) अहंता-ममता केली नाही, आपल्या स्वरूपात स्थित राहीला, तर हा पुरुष सुख-दु:खाचा भोक्ता कधी बनणार नाही, तर सुख-दु:खात सम होईल, स्वस्थ होईल (१४।२४). म्हणून हा प्रकृतीतही स्थित होऊ शकतो आणि आपल्या स्वरूपातही स्थित होऊ शकतो. फरक एवढाच आहे की, प्रकृतीत स्थित होण्यात हा परतंत्र आहे आणि स्वरूपात स्थित होण्यात, हा स्वाभाविक स्वतंत्र आहे. बंधनात सापडणे याचे अस्वाभाविक आहे आणि मुक्त होणे याचे स्वाभाविक आहे. म्हणून बंधन याला आवडत नाही आणि मुक्त होणे याला आवडत असते.

जेथे प्रकृती आणि पुरुष दोघांचा भेद (विवेक) आहे तेथेच प्रकृतीशी तादात्म्य करण्याचे, संबंध जोडण्याचे अज्ञान आहे. ह्या अज्ञानानेच हा पुरुष स्वत: प्रकृतीशी तादात्म्य करून घेतो. तादात्म्य करून घेतल्याने हा पुरुष आपल्याला प्रकृतिस्थ अर्थात् प्रकृतीमध्ये (शरीर) स्थित मानतो. प्रकृतिस्थ झाल्याने शरीराविषयी ''मी'' आणि ''माझेपणा'' उत्पन्न होतो. हाच गुणांचा संग आहे. या गुणसंगाने पुरुष बांधला जातो (१४।५). गुणांद्वारा बांधला गेल्यानेच पुरुषाची गुणांनुसार गती होत असते (१४।१८)

**परिशिष्ट भाव**—भगवंताने एकोणीसाव्या श्लोकाच्या उत्तरार्धात आणि वीसाव्या श्लोकाच्या पूर्वार्धात 'प्रकृती' चे वर्णन केले आहे आणि वीसाव्या श्लोकाच्या उत्तरार्धात आणि येथे एकवीसाव्या श्लोकात 'पुरुष' याचे वर्णन केले आहे.

* येथे पुरुषाला प्रकृतिस्थ म्हणण्याचे तात्पर्य, ''शरीरस्थ'' म्हणणेच आहे. एकोणीसाव्या श्लोकापासून प्रकृती-पुरुषाचे प्रकरण चालू आहे, म्हणूनच येथे पुरुषाला प्रकृतिस्थ म्हटले गेले आहे. वास्तविक पुरुष प्रकृतिस्थ अथवा शरीरस्थ नाही. स्वत:ला स्वस्थ न मानल्याने अर्थात् स्व मध्ये आपल्या स्थितीचा अनुभव न करण्यानेच तो आपल्याला शरीरस्थ मानतो.

वस्तू, व्यक्ती आणि क्रिया यांच्याशी संबंध जोडणे हाच 'गुणसंग' आहे, जो जन्म-मरणाला कारण आहे. गुणांचा संग अनित्य आहे आणि गुणांशी असंगता नित्य आहे. असंगता आपले स्वरूप आहे—'**असङ्गोह्ययं पुरुषः**' (बृहदा० ४ । ३ । १५). जर आपण अनित्याला (गुणसंगाला) पकडणार नाही तर जन्म-मरण होऊच शकत नाही.

'मी' जड (प्रकृती) आहे आणि 'आहे' चेतन (पुरुष) आहे. तसेच 'मी आहे'—हे जड-चेतनाचे तादात्म्य आहे. या 'मी आहे' मध्येच कर्तेपणा आणि भोक्तेपणा राहतो. जर 'मी' राहिलो नाही

तर 'एकदेशीय आहे' राहणार नाही तर 'सर्वव्यापक आहे' राहील. जसे लोखंड आणि अग्नीमध्ये तादात्म्य न राहिल्याने लोखंड पृथ्वीवरच राहते आणि अग्नी निराकार अग्नि-तत्त्वामध्ये लीन होतो. तसेच अहम् तर प्रकृतीतच राहतो आणि 'एकदेशीय आहे' ('सर्वव्यापी आहे' चे स्वरूप असल्याने) 'सर्वव्यापी आहे' मध्येच विलीन होतो. 'सर्वव्यापक आहे' मध्ये कर्तेपणा-भोक्तेपणा नाही. तात्पर्य हे आहे की, भोगांमध्ये 'एकदेशीय आहे' ओढला जातो, 'सर्वव्यापी आहे' ओढला जात नाही. 'एकदेशीय आहे' हाच कर्ता-भोक्ता बनतो, 'सर्वव्यापक आहे' कर्ता-भोक्ता बनत नाही. म्हणून साधकाने 'एकदेशीय आहे' ला न मानता 'सर्वव्यापी आहे' लाच मानावे अर्थात् अनुभव करावा.

सुख-दुःखाच्या येण्या-जाण्याचा आणि स्वयंच्या राहण्याचा अनुभव सर्वांना आहे. पाप्यातल्या पापी मनुष्याला सुद्धा याचा अनुभव आहे. असा अनुभव असूनही मनुष्य आगंतुक सुख-दुःखाशी मिसळून सुखी-दुखी होतो. याचे कारण असे आहे की, सुखाची आसक्ती आणि दुःखाचे भय राहिल्याने 'मी वेगळा आहे आणि सुख-दुःख वेगळे आहेत'—हा विवेक काम करीत नाही. वास्तविक स्वयं सुखी-दुःखी होत नाही, तर शरीराशी मिसळून आपल्याला सुखी-दुःखी मानतो. तात्पर्य असे आहे की, सुख-दुःख केवळ अविवेकपूर्वक केल्या गेलेल्या मान्यतेवर टिकलेले आहेत.

***संबंध**—एकोणीसाव्या, वीसाव्या आणि एकवीसाव्या श्लोकांत प्रकृती आणि पुरुषाचे वर्णन झाले. आता पुढील श्लोकात पुरुषाचे विशेषत्वाने वर्णन करीत आहेत.*

## उपद्रष्टानुमन्ता च भर्ता भोक्ता महेश्वरः।
## परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन्पुरुषः परः॥२२॥

हा पुरुष—

| | |
|---|---|
| **उपद्रष्टा** | = (शरीराशी संबंध ठेवल्यामुळे) 'उपद्रष्टा' |
| **अनुमन्ता** | = (त्याच्याशी मिसळून सम्मती, अनुमती दिल्यामुळे) 'अनुमंता', |
| **भर्ता** | = (स्वतःला त्याचे भरण-पोषण करणारा मानल्यामुळे) 'भर्ता' |
| **भोक्ता** | = (त्याच्या संगाने सुख-दुःख भोगल्यामुळे) 'भोक्ता' |
| **च** | = आणि |
| **महेश्वरः** | = (स्वतःला त्याचा स्वामी मानल्यामुळे) 'महेश्वर' (बनतो). |
| **च** | = परंतु |
| **पुरुषः** | = (स्वरूपाने हा) पुरुष |
| **परमात्मा** | = 'परमात्मा'— |
| **इति** | = या नावाने |
| **उक्तः** | = म्हटला जातो. (हा) |
| **अस्मिन्** | = या |
| **देहे, अपि** | = देहात राहूनही (देहाहून) |
| **परः** | = परच (सर्वथा संबध-रहितच) आहे. |

*व्याख्या*—**उपद्रष्टानुमन्ता च भर्ता भोक्ता महेश्वरः**—हा पुरुष स्वरूपाने नित्य आहे, सर्वत्र परिपूर्ण आहे, स्थिर आहे, अचल आहे, सदा राहणारा आहे, (२।२४) असे असूनही, जेव्हा हा प्रकृती आणि तिचे कार्य शरीराकडे दृष्टी टाकतो अर्थात् त्यांच्याशी आपला संबंध समजतो, तेव्हा याची "**उपद्रष्टा**" संज्ञा होत असते.

हा प्रत्येक कार्य करण्याविषयी सम्मती, अनुमती देतो, म्हणून याला "**अनुमन्ता**" म्हणतात.

हा एका व्यष्टी शरीराशी मिसळून, त्याच्याशी तादात्म्य करून अन्न-पाणी इत्यादीने शरीराचे पालन-पोषण करतो, शीत-उष्ण इत्यादीपासून त्याचे संरक्षण करतो. म्हणून याचे नाव "**भर्ता**" होते.

हा शरीराशी मिसळून अनुकूल परिस्थिती प्राप्त झाल्यास आपल्याला सुखी मानतो आणि प्रतिकूल-परिस्थिती प्राप्त झाल्यास स्वतःस दुःखी मानतो. म्हणून याची "**भोक्ता**" संज्ञा होते.

हा स्वतःला शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, तसेच धन, संपत्ती इत्यादीचा मालक समजतो. म्हणून हा "**महेश्वर**"

नावाने म्हटला जातो.

**परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन्पुरुषः परः**—पुरुष सर्वोत्कृष्ट आहे, परम आत्मा आहे, म्हणून शास्त्रांत याला "परमात्मा" म्हटले गेले आहे. हा देहात राहत असूनही स्वाभाविक देहाच्या संबंधाने रहित आहे. पुढे याच अध्यायाच्या एकतीसाव्या श्लोकात याच्या विषयात म्हटले गेले आहे की, हा शरीरात राहूनसुद्धा काही करतही नाही आणि लिप्तही होत नाही.

या श्लोकात, एकाच तत्त्वाला वेगवेगळ्या उपाधीच्या संबंधाने "**उपद्रष्टा**" इत्यादी पदांनी संबोधित केले गेले आहे, म्हणून या वेग-वेगळ्या नावाने पुरुषाच्याच स्वरूपाचे वर्णन समजावे. वास्तविक, त्यात कोणत्याही प्रकारचा भेद नाही. जसे एकच व्यक्ती देश, काळ, वेश, संबंध इत्यादीनुसार वेग-वेगळ्या (पिता, काका, नाना, भाऊ) नावांनी संबोधिली जाते, तसेच पुरुष निरनिराळ्या नावांनी संबोधिला गेला तरी वास्तविक एकच आहे.

**परिशिष्ट भाव**—वास्तविक पुरुष 'पर' च आहे, परंतु इतराच्या संबंधाने उपद्रष्टा, अनुमंता इत्यादी बनतो. जसे मनुष्य पुत्राच्या संबंधाने 'पिता', पित्याच्या संबंधाने 'पुत्र', पत्नीच्या संबंधाने 'पती', बहिणीच्या संबंधाने 'बंधू' इत्यादी बनतो. हे संबंध आपले कर्तव्यपालन करण्यासाठीच आहेत, ममता करण्यासाठी नव्हे. वास्तविक स्वरूप तर 'पर' अर्थात् संपूर्णपणे संबंधरहित आहे.

येथे उपद्रष्टा, अनुमंता इत्यादी अनेक उपाधींचे तात्पर्य ऐक्यात आहे की, चेतन तत्त्व वास्तविक एकच आहे. ज्ञानाच्या प्रकरणात प्रकृती आणि पुरुष दोघांचेच वर्णन मुख्य आहे. म्हणून येथे आलेले उपद्रष्टा, अनुमंता, ईश्वर इत्यादी सर्व शब्द 'पुरुष' याचे वाचक समजावे.

*संबंध—एकोणीसाव्या श्लोकापासून बावीसाव्या श्लोकापर्यंत प्रकृती आणि पुरुषाचे विवेचन करून आता पुढील श्लोकात त्या दोघांना तत्त्वाने जाणून घेण्याचे फल सांगतात.*

**य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह।**
**सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते॥ २३॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **एवं** | = अशाप्रकारे | **प्रकृतिम्** | = प्रकृतीला | **सर्वथा** | = सर्व प्रकारचे |
| **पुरुषम्** | = पुरुषाला | **यः** | = जो मनुष्य | **वर्तमानःअपि** | = वर्तन करत असूनही |
| **च** | = आणि | **वेत्ति** | = वेग-वेगळा जाणतो, | **भूयः** | = पुन्हा |
| **गुणैः, सह** | = गुणांसहित | **सः** | = तो | **न, अभिजायते** | = जन्माला येत नाही. |

*व्याख्या*—**य एवं वेत्ति....न स भूयोऽभिजायते**—पूर्व श्लोकात "**देहेऽस्मिन्पुरुषः परः**" पदांनी पुरुषाला देहापासून वेगळा अर्थात् संबंधरहित म्हटले आहे. त्यालाच येथे "**एवम्**" पदाने म्हणतात की, जो साधक याप्रमाणे पुरुषाला देहापासून, प्रकृतीपासून पर अर्थात् संबंधरहित जाणून घेतो तसेच विकार, कार्य, करण, विषय इत्यादीरूपाने जो काही संसार दिसतो, तो सर्व प्रकृती आणि तिच्या गुणांचे कार्य आहे—असे यथार्थरूपाने जाणून घेतो, तो मग वर्ण, आश्रम, परिस्थिती इत्यादीनुसार प्राप्त कर्तव्यकर्म करत असला तरी पुनर्जन्माला प्राप्त होत नाही. कारण जन्म होण्यात गुणांचा संगच कारण आहे (१३।२१)

येथे "**सर्वथा वर्तमानोऽपि**" पदांमध्ये निषिद्ध आचरण घेता कामा नये, कारण जो स्वतःला देह संबंधरहित अनुभवतो आणि गुणांसहित प्रकृतीला आपल्यापासून वेगळे अनुभवतो, त्याच्यात असत् वस्तूंची कामना उत्पन्न होऊच शकत नाही. कामना नसल्याने त्याच्याकडून निषिद्ध आचरण होणे असंभव आहे, कारण निषिद्ध आचरण होण्यात कामनाच हेतु असते. (३।३७)

भगवान् या ठिकाणी साधकाला आपले वास्तविक स्वरूप जाणून घेण्यासाठी सावधान करतात ज्यामुळे त्याने उत्तम प्रकारे जाणून घ्यावे की, स्वरूपात वास्तविक कोणतीही क्रिया नसते. म्हणून तो कोणत्याही क्रियेचा कर्ता नाही आणि कर्ता नसल्याकारणाने, तो भोक्ताही होत नाही. साधक जेव्हा आपल्या-स्वतःला अकर्ता जाणून घेतो, तेव्हा त्याच्या कर्तेपणाचा अभिमान आपोआप नष्ट होतो आणि त्याच्यात क्रियेची फलासक्तीही राहत नाही. असे असले तरीही, त्याच्याकडून शास्त्रविहित क्रिया आपोआप होत राहतात. गुणातीत झाल्यामुळे तो पुनर्जन्माला प्राप्त होत नाही.

**परिशिष्ट भाव**—पूर्व श्लोकात आलेल्या '**देहेऽस्मिन् पुरुषः परः**' ची व्याख्या या श्लोकात करतात. ज्याचा विवेक जागृत झालेला आहे अर्थात् '**देहेऽस्मिन् पुरुषः परः**'—हे अनुभवात आले आहे, तो आपल्या वर्ण, आश्रमानुसार सर्व कर्म

करूनही निर्लिप्त राहतो. वास्तविक मनुष्यमात्राचे स्वरूप निर्लिप्तच आहे, परंतु गुणांच्या संगाने तो लिप्त होतो आणि वारंवार जन्मत-मरत राहतो (याच अध्यायाचा एकवीसावा श्लोक). गुणांचा संबंध प्रकृतीशी आहे, पुरुषाशी नाही (याच अध्यायाचा एकोणीस-वीसावा श्लोक).

**'सर्वथा वर्तमानोऽपि'** पदांत आलेले **'अपि'** चे तात्पर्य असे आहे की, तो आसक्त मनुष्यासारखे सर्व वर्तन करूनही निर्विकार राहतो (गीता—तीसऱ्या अध्यायाचा पंचवीसावा श्लोक).

**'न स भूयोऽभिजायते'**—जसे ताकातून निघालेले लोणी पुन्हा ताकात मिसळून दही बनत नाही, तसेच प्रकृतिजन्य गुणांशी संबंध-विच्छेद झाल्यास मनुष्य पुन्हा गुणाने बांधला जात नाही. त्याचे ब्रह्माशी साधर्म्य होते अर्थात् जसे ब्रह्माचे जन्म-मरण होत नाही, तसेच त्याचेही जन्म-मरण होत नाही.

सहाव्या अध्यायाच्या एकतीसाव्या श्लेकात आले आहे—**'सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते'** आणि येथे आले आहे—**'सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते'**. सहाव्या अध्यायात आलेल्या **'स योगी मयि वर्तते'** पदांत प्रेमाची प्राप्ती आहे आणि येथे आलेल्या **'न स भूयोऽभिजायते'** पदांत बोधाची प्राप्ती आहे. प्रेम आणि बोध—दोन्हीतही गुणांचा संग राहत नाही. दोन्हीत फरक असा आहे की, बोधात तर जन्म-मरणापासून मुक्ती होते, परंतु प्रेमात मुक्तीबरोबर भगवंताशी अभिन्नता होते.

***संबंध***—*पूर्व श्लेकात भगवंतांनी जन्मरहित होण्यात प्रकृती-पुरुषांना यथार्थ जाणून घेणे कारण म्हटले. आता ही जिज्ञासा होते की, जन्म-मरणरहित होण्याचा आणखीही कोणता उपाय आहे काय? याचे उत्तर म्हणून भगवान् पुढील दोन श्लोकांत चार साधने सांगतात.*

## ध्यानेनात्मनि पश्यन्ति केचिदात्मानमात्मना।
## अन्ये साङ्ख्येन योगेन कर्मयोगेन चापरे॥ २४॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **केचित्** | = कित्येक मनुष्य | **च** | = आणि | | आपल्याद्वारा |
| **ध्यानेन** | = ध्यानयोगाद्वारा, | **अपरे** | = कित्येक | **आत्मनि** | = आपणच-आपल्यात |
| **अन्ये** | = कित्येक | **कर्मयोगेन** | = कर्मयोगाद्वारा | **आत्मानम्** | = परमात्मतत्त्वाचा |
| **साङ्ख्येन, योगेन** | = सांख्ययोगाद्वारा | **आत्मना** | = आपणच- | **पश्यन्ति** | = अनुभव करतात. |

***व्याख्या*— ध्यानेनात्मनि पश्यन्ति केचिदात्मानमात्मना**—पाचव्या अध्यायाच्या सत्तावीसाव्या अठ्ठावीसाव्या श्लेकांत, सहाव्या अध्यायाच्या दहाव्यापासून अठ्ठावीसाव्या श्लेकांपर्यंत आणि आठव्या अध्यायाच्या आठव्यापासून चौदाव्या श्लेकांपर्यंत जे सगुण-साकार, निर्गुण-निराकार इत्यादीच्या ध्यानाचे वर्णन झाले आहे, त्या ध्यानात ज्याची जशी आवड, श्रद्धा-विश्वास आणि योग्यता आहे, त्यानुसार ध्यान करून कित्येक साधक आपणच आपल्यामध्ये परमात्मतत्त्वाचा अनुभव करतात.

जो संबंध-विच्छेद, प्रकृती आणि पुरुष यांना वेग-वेगळे जाणून घेतल्याने होतो, तो संबंध-विच्छेद ध्यानानेही होतो. ध्यान, चित्ताच्या मूढ वृत्तीतही होत नाही आणि क्षिप्त वृत्तीतही होत नाही. ध्यान विक्षिप्त वृत्तीत आरंभ होते. चित्त जेव्हा स्वरूपात एकाग्र होते, तेव्हा समाधी लागते. एकाग्र झाल्याने चित्ताचा निरोध होतो. अशा रीतीने ज्या अवस्थेत चित्त निरुद्ध होते, त्या अवस्थेत चित्त संसार, शरीर, वृत्ती, चिंतन इत्यादीपासूनही उपरत होते. त्यावेळी ध्यानयोगी आपणच-आपल्यात आपला अनुभव करून संतुष्ट होतो (६।१९-२०)

**अन्ये साङ्ख्येन योगेन**—दुसऱ्या अध्यायाच्या अकराव्या-पासून तीसाव्या श्लेकापर्यंत, चौथ्या अध्यायाच्या तेहतीसाव्या पासून एकोणचाळीसाव्या श्लेकापर्यंत, पाचव्या अध्यायाच्या आठव्या, नवव्या तसेच तेराव्यापासून सव्वीसाव्या श्लेका-पर्यंत आणि बाराव्या अध्यायाच्या चौथ्या-पाचव्या इत्यादी श्लेकांत सांगितलेल्या सांख्ययोगाद्वारा कित्येक साधक आपण आपल्यात परमात्मतत्त्वाचा अनुभव करतात.

विवेकाचे नाव सांख्ययोग आहे. त्या विवेकद्वारा सत्-असत्चा निर्णय होत असतो की, ''सत्'' नित्य आहे, सर्व व्यापक आहे, स्थिर स्वभावाचे आहे, अचल आहे, अव्यक्त आहे, अचिन्त्य आहे आणि ''असत्'' चल आहे, अनित्य आहे, विकारी आहे, परिवर्तनशील आहे अशा विवेक-विचाराने सांख्ययोगी प्रकृत्ती आणि तिचे कार्य यापासून बिलकुल वेगळा होतो आणि आपण आपल्यातच परमात्मतत्त्वाचा अनुभव करतो.

**कर्मयोगेन चापरे**—दुसऱ्या अध्यायाच्या सत्तेचाळीसाव्या-पासून त्रैपन्नाव्या श्लेकापर्यंत, तीसऱ्या अध्यायाच्या सातव्या

पासून एकोणीसाव्या श्लोकापर्यंत, चौथ्या अध्यायाच्या सोळाव्यापासून बत्तीसाव्या श्लोकापर्यंत, पाचव्या अध्यायाच्या सहाव्या-सातव्या इत्यादी श्लोकांत सांगितलेल्या कर्मयोगाद्वारा कित्येक साधक आपणच आपल्याद्वारा आपल्यामध्ये परमात्मतत्त्वाचा अनुभव करतात.

जो संबंध-विच्छेद प्रकृती आणि पुरुष यांना वेगवेगळे जाणल्याने होतो, तो संबंध-विच्छेद कर्मयोगानेही होतो. कर्मयोगी जे काही करतो, ते संसाराच्या हितासाठीच करतो. यज्ञ, दान, तप, तीर्थ, व्रत इत्यादी जे काही करतो, ते सर्व संपूर्ण प्राण्यांच्या कल्याणासाठीच करतो, आपल्यासाठी नव्हे. असे करण्याने स्व चा त्या क्रिया, पदार्थ, शरीर इत्यादीशी संबंध-विच्छेद होतो आणि त्याला आपणच आपल्याद्वारा आपल्यामध्ये परमात्मतत्त्वाचा अनुभव येतो.

मनुष्याने स्वाभाविकच आपल्यामध्ये देहाचा स्वीकार केला आहे, मानला आहे. या मान्यतेला समाप्त करण्यासाठी आपल्यात परमात्म्याला पाहणे अर्थात् देहाऐवंजी आपल्यात परमात्म्याला मानणे फार आवश्यक आहे.

आपल्यात परमात्म्याला पाहणे करणनिरपेक्ष असते. करणसापेक्ष ज्ञान प्रकृतीच्या संबंधाने होते. म्हणून साधक कोणत्याही करणद्वारा परमात्म्यात स्थित होत नाही, तर स्व-च स्थित होत असतो. स्व ची परमात्म्यात स्थिती कोणत्याही करणद्वारा होऊच शकत नाही.

**परिशिष्ट भाव**—जसे पूर्व श्लोकात विवेकाच्या महत्त्वाला मुक्तीचा उपाय सांगितला, तसेच तेथे ध्यानयोग इत्यादी अन्य उपाय सांगतात. गीतेत ध्यानयोगाने परमात्मप्राप्तीचा विषय सहाव्या अध्यायाच्या अट्ठावीसाव्या श्लोकात सांगितला आहे. सांख्ययोगाने परमात्मप्राप्तीचा विषय दुसऱ्या अध्यायाच्या पंधराव्या श्लोकात सांगितला आहे आणि कर्मयोगाने परमात्मप्राप्तीचा विषय दुसऱ्या अध्यायाच्या एकाहत्तराव्या श्लोकात सांगितला आहे. हे सर्वच परमात्मप्राप्तीचे स्वतंत्र साधन आहेत.

## अन्ये त्वेवमजानन्तः श्रुत्वान्येभ्य उपासते।
## तेऽपि चातितरन्त्येव मृत्युं श्रुतिपरायणाः॥ २५॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अन्ये** | = दुसरी माणसे | **अन्येभ्यः** | = दुसऱ्यांकडून (जीवन्मुक्त महापुरुषांकडून) | **श्रुतिपरायणाः** | = ऐकण्यानुसार आचरण करणारी |
| **एवम्** | = अशाप्रकारे (ध्यानयेग, सांख्ययोग, कर्मयोग इत्यादी साधनांना) | **श्रुत्वा, एव** | = ऐकूनच | **अपि** | माणसेही |
| **अजानन्तः** | = जाणत नाहीत, | **उपासते** | = उपासना करतात, | **मृत्युम्** | = मृत्यूला |
| **तु** | = परंतु | **च, ते** | = असे ते | **अतितरन्ति** | = तरून जातात. |

*व्याख्या*— **अन्ये त्वेवमजानन्तः.........मृत्युं श्रुतिपरायणाः**—कित्येक मनुष्य अशा तत्त्वप्राप्तीची उत्कंठा असणारे आहेत, जे ध्यानयोग, सांख्ययोग, कर्मयोग, हठयोग, लययोग इत्यादी साधनांना जाणतच नाहीत, म्हणून ते साधन त्यांच्या अनुष्ठानातही येत नाहीत. अशी माणसे केवळ तत्त्वज्ञ जीवन्मुक्त महापुरुषांच्या आज्ञेचे पालन करून मृत्यूला तरून जातात. अर्थात् तत्त्वज्ञान प्राप्त करून घेतात. जसे धनी माणसाची आज्ञा पालन करण्याने धन मिळत असते, तसेच तत्त्वज्ञ जीवन्मुक्त महापुरुषांच्या आज्ञेचे पालन केल्याने तत्त्वज्ञान प्राप्त होते. मात्र यामध्ये एवढा फरक आहे की, धनी जेव्हा धन देतो, तेव्हा धन मिळते, परंतु संत महापुरुषांची आज्ञा पालन करण्याने, त्यांच्या मनाच्या, संकेताच्या, आज्ञेच्या अनुसार तत्परतेने वर्तन करण्याने मनुष्य आपोआप त्या परमात्मतत्त्वाला प्राप्त होत असतो, जे सर्वांना नेहमीच स्वतः स्वाभाविक प्राप्त आहे. कारण धन तर धनी मनुष्याच्या अधीन असते, परंतु परमात्मतत्त्व कोणाच्याही अधीन नसते.

शरीराशी संबंध ठेवण्यानेच मृत्यू होत असतो. जी माणसे महापुरुषांच्या आज्ञेशी परायण असतात, त्यांचा शरीराशी मानलेला संबंध सुटून जातो. म्हणून ते मृत्यूला तरून जातात, अर्थात् ते पूर्वी शरीराच्या मृत्यूला आपला मृत्यू मानत होते, ती मान्यता त्यांची समाप्त होते.

अशा श्रुतिपरायण साधकांच्या तीन श्रेणी असतात—

(१) जर साधकात सांसारिक सुखभोगाची इच्छा नाही, केवळ तत्त्वप्राप्तीचीच उत्कट अभिलाषा आहे आणि तो ज्यांची आज्ञा पालन करत असतो, ते अनुभवी महापुरुष असतील, तर साधकाला लवकरच परमात्म्याची प्राप्ती होते.

(२) जर साधकात सुखभोगाची इच्छा शिल्लक असेल, तर केवळ महापुरुषाच्या आज्ञेचे पालन करण्यानेच त्याच्या त्या इच्छेचा नाश होईल आणि त्याला परमात्मप्राप्ती होऊन जाईल.

(३) साधक ज्यांच्या आज्ञेचे पालन करत असतो, ते अनुभवी महापुरुष नसतील, परंतु साधकात किंचित्मात्रही सांसारिक इच्छा नसेल आणि त्याचा उद्देश केवळ परमात्म्याची प्राप्ती करणे असेल, तर त्याला भगवत्कृपेने परमात्मप्राप्ती होईल, कारण भगवान् तर त्याला जाणतच असतात.

जर एखाद्या कारणाने साधकाची संत महापुरुषा-विषयी अश्रद्धा, दोष-दृष्टी झाली तर साधकाला त्यांच्यात अवगुणच अवगुण दिसतील, गुण दिसणारच नाहीत. याचे कारण असे आहे की, महापुरुष गुणावगुणांच्या पलीकडे गेलेले, (गुणातीत) असतात. म्हणून त्यांच्यात अश्रद्धा झाल्यावर आपलेच भाव आपल्याला दिसतात. मनुष्य ज्या भावनेने पाहत असतो, त्याच भावाशी त्याचा संबंध होतो. अवगुण पाहण्याने त्याचा संबंध अवगुणाशी होत असतो. म्हणून साधकाने तत्त्वज्ञ महापुरुषांच्या क्रियांवर, त्यांच्या आचरणावर, लक्ष न देता त्यांच्याजवळ तटस्थ होऊन रहावे. जो जेव्हा संत महापुरुषांशी कोणताही सांसारिक व्यवहाराचा संबंध न ठेवता केवळ पारमार्थिक (साधनेचा) संबंध जोडतो तेव्हाच संत महापुरुषांचा अधिक लाभ तो घेऊ शकतो. दुसरी गोष्ट, साधकाने ही सावधगिरी बाळगावी की, त्याच्याकडून त्या महापुरुषाची कोठेही निंदा केली जाऊ नये. जर त्याने त्यांची निंदा केली, तर त्याची कुठेही उन्नती होणार नाही.

**परिशिष्ट भाव**—ज्या माणसांत शास्त्र समजण्याची योग्यता नसते, ज्यांचा विवेक कमजोर आहे, परंतु ज्याच्या अंत:करणात मृत्यूपासून तरून जाण्याची उत्कट अभिलाषा आहे, अशी माणसे सुद्धा जीवन्मुक्त संत-महात्म्यांच्या आज्ञेचे पालन करून मृत्यूला तरून जातात.

उपनिषदात एक कथा येते. जाबालाचा पुत्र सत्यकाम गौतमऋषीजवळ उपदेश प्राप्त करण्यासाठी गेला. ऋषींनी त्याला चारशे कृश आणि निर्बल गायी देऊन म्हटले की, तू यांच्या मागोमाग जा. सत्यकामाने उत्साहाने म्हटले की, यांची संख्या एक हजार झाल्यावरच मी परत येईल. असे म्हणून तो त्या गायींना वनात घेऊन गेला आणि तेथे त्यांचे पालन-पोषण करू लागला. पुष्कळ वर्षे गेल्यावर जेव्हा त्यांची संख्या एक हजार झाली, तेव्हा एका गोऱ्ह्याने त्याला म्हटले की, आमची संख्या एक हजार झाली आहे, आता तू आम्हाला आचार्यांजवळ पोहचव. असे म्हणून त्या गोऱ्ह्याने सत्यकामाला ब्रह्माच्या प्रथम पादाचा उपदेश केला. दुसरेच दिवशी सत्यकाम गायींना घेऊन गुरुकुलकडे रवाना झाला. वाटेत त्याला अग्नीने ब्रह्माच्या दुसऱ्या पादाचा, हंसाने ब्रह्माच्या तीसऱ्या पादाचा आणि मदगुने (एकाजलचर पक्षाने) ब्रह्माच्या चवथ्या पदाचा उपदेश दिला. अशाप्रकारे वाटेतच ब्रह्मज्ञान प्राप्त करून तो गौतमऋषी जवळ पोहचला. गुरूंनी विचारल्यावर त्याने सारे वृत्त सांगितले आणि त्यांच्याकडून स्वमुखाने उपदेश देण्याची प्रार्थना केली. तेव्हा गौतमऋषींनी त्याला उपदेश दिला (छान्दोग्य० चवथा अध्याय, चवथ्यापासून नवव्या खंडापर्यंत). अशाप्रकारे केवळ तत्त्वज्ञ, जीवन्मुक्त महापुरुषाची आज्ञा मानल्यानेच सत्यकामाला तत्त्वज्ञान झाले.

***संबंध**—पूर्व श्लोकात म्हटले गेले आहे की, श्रुतिपरायण साधकही मृत्यू तरून जातो, तर आता प्रश्न होतो की मृत्यू होण्यात काय कारण आहे? याचे उत्तर भगवान् पुढील श्लोकात देत आहेत*

## यावत्सञ्जायते किञ्चित्सत्त्वं स्थावरजङ्गमम्।
## क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ॥ २६॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **भरतर्षभ** | = हे भरतवंशात श्रेष्ठ असलेले अर्जुन! | **यावत्, किञ्चित्** | = जितके काही | **क्षेत्र क्षेत्रज्ञ-संयोगात्** | = क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाच्या संयोगाने (उत्पन्न झालेले) |
| | | **सत्त्वम्** | = प्राणी | | |
| | | **सञ्जायते** | = उत्पन्न होतात, | | |
| **स्थावरजङ्गमम्** | = स्थावर आणि जंगम | **तत्** | = त्यांना (तू) | **विद्धि** | = समज. |

***व्याख्या*— यावत्संजायते.....क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्—** स्थिर राहणारे वृक्ष, लता, हरळी, बेत, वेळू, पर्वत इत्यादी जितके काही स्थावर प्राणी आहेत आणि चालणारे-फिरणारे मनुष्य, देवता, पशू, पक्षी, कीट, पतंग, मासा, कासव इत्यादी जितके काही जंगम (थलचर, जलचर, नभचर) प्राणी आहेत, ते सर्वचे सर्व क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाच्या संयोगानेच उत्पन्न होतात.

उत्पत्ति-विनाशशील पदार्थ "क्षेत्र" आहेत आणि जो या क्षेत्राला जाणणारा, उत्पत्ति-विनाशरहित, तसेच सदा एकरस राहणारा आहे, तो "क्षेत्रज्ञ" आहे. त्या क्षेत्रज्ञाचा (प्रकृतिस्थ पुरुष) जो, शरीराशी मी माझेपणाचा संबंध मानणे आहे—हाच क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाचा संयोग आहे. या

मानलेल्या संयोगाच्या कारणानेच या जीवाला स्थावर-जंगम योनीत जन्म घ्यावा लागतो. याच क्षेत्र-क्षेत्रज्ञाच्या संयोगाला पूर्वी एकेवीसाव्या श्लोकात "**गुणसङ्गः**" पदाने म्हटले आहे. तात्पर्य, निरंतर परिवर्तनशील प्रकृती आणि प्रकृतीचे कार्य शरीरादीशी तादात्म्य करून घेतल्याने स्वतः जीवात्मासुद्धा आपल्याला जन्मणारा आणि मरणारा मानून घेतो.

[स्थावर-जंगम प्राण्यांच्या उत्पत्तीसंबंधी विषय तर येथे "**संजायते**" पदाने सांगितला गेला आणि त्यांच्या मृत्यूविषयी विचार पुढील श्लोकात "**विनश्यत्सु**" पदाने सांगतील]

**तद्विद्धि भरतर्षभ**—हा क्षेत्रज्ञ क्षेत्राशी आपला संबंध मानतो, यामुळेच याचा जन्म होत असतो, परंतु जर ह्याने शरीराशी आपला संबंध मानला नाही, तर याचा जन्म होणार नाही. ही गोष्ट तू योग्य रीतीने समजून घे.

**परिशिष्ट भाव**—येथे '**यावत्सञ्जायते**' याच्या अंतर्गत जरायुज, अंडज, उद्भिज, स्वेदज, जलचर, नभचर, थलचर, मनुष्य, देवता, पितर, भूत, प्रेत, पिशाच इत्यादी संपूर्ण प्राणी घ्यावे. सातव्या अध्यायाच्या सहाव्या श्लोकातही '**एतद्योनीनि भूतानि**' पदांनी हीच गोष्ट सांगितली गेली आहे.

भक्तीच्या प्रकरणात भगवंताने परा आणि अपरा—दोन्हींना आपली प्रकृती सांगून म्हटले की, 'या दोन्ही प्रकृतीच्या संयोगानेच संपूर्ण प्राणी उत्पन्न होतात आणि मीच संपूर्ण जगताचा प्रभव आणि प्रलय आहे' (गीता—सातव्या अध्यायाचा सहावा श्लोक). परंतु येथे ज्ञानाच्या प्रकरणात भगवान् म्हणतात की, संपूर्ण प्राणी क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांच्या संयोगाने उत्पन्न होतात. तात्पर्य हे आहे की, भक्तीच्या प्रकरणात भगवान् आपल्याकडे दृष्टी करवितात. कारण भक्ताचा भगवंतावरच दृढ विश्वास असतो. त्याचे साधन आणि साध्य—दोन्ही भगवान्च असतात. परंतु ज्ञानात भगवान् क्षेत्रज्ञाकडे (स्वरूपाकडे) दृष्टी करवितात की, क्षेत्राशी तादात्म्य केल्यामुळेच तो जन्म-मृत्युरूपी बंधनात सापडला आहे. येथे असा प्रश्न होतो की, आकर्षण आणि मिलन (संयोग) सजातीयतेतच होतो. मग विजातीय क्षेत्राशी (जडाशी) क्षेत्रज्ञाचा (चेतनाचा) संयोग कसा झाला? याचे उत्तर असे आहे की, जसे रात्री आणि दिवस यांचा संयोग होऊ शकत नाही, तसेच क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाचाही संयोग होऊ शकत नाही. परंतु परमात्म्याचा अंश असल्याकारणाने क्षेत्रज्ञात अशी शक्ती आहे की, तो विजातीय वस्तूलाही पकडू शकतो, त्याच्याशी आपला संबंध मानू शकतो. त्याला ही स्वतंत्रता भगवंतानेच दिली आहे. परंतु त्याने या स्वतंत्रतेचा दुरुपयोग केला अर्थात् भगवंताशी संबंध न मानता संसाराशी संबंध मानला आणि जन्म-मरणाच्या चक्रात सापडला (गीता—तेराव्या अध्यायाचा एकवीसावा श्लोक).

***संबंध**—पूर्व श्लोकात भगवंतांनी सांगितले की, क्षेत्राशी (शरीर) संबंध ठेवल्याने, त्याचेकडे दृष्टी ठेवल्याने हा पुरुष जन्म-मरणाच्या चक्रात सापडतो. तेव्हा आता प्रश्न होतो की, या जन्म-मरणाच्या चक्रातून सुटण्यासाठी त्याने काय केले पाहिजे ? याचे उत्तर भगवान् पुढील श्लोकात देत आहेत.*

## समं सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरम्।
## विनश्यत्स्वविनश्यन्तं यः पश्यति स पश्यति॥ २७॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यः** | = जो | **परमेश्वरम्** | = परमेश्वराला | **पश्यति** | = पाहतो, |
| **विनश्यत्सु** | = नष्ट होत असलेल्या | **अविनश्यन्तम्** | = नाशरहित (आणि) | **सः** | = तोच |
| **सर्वेषु** | = संपूर्ण | **समम्** | = समरूपाने | **पश्यति** | = (वास्तविक योग्य रीतीने) पाहतो. |
| **भूतेषु** | = प्राण्यांत | **तिष्ठन्तम्** | = स्थित असलेला | | |

*व्याख्या*— **समं सर्वेषु भूतेषु**—परमात्म्याला संपूर्ण प्राण्यांमध्ये सम म्हणण्याचे तात्पर्य, सर्वच प्राणी विषम आहेत अर्थात् स्थावर जंगम आहेत, सात्त्विक, राजस, तामस आहेत, आकृतीने लहान-मोठे, उंच ठेंगणे, नाना वर्णांचे आहेत. अशा प्रकारचे निरनिराळे जितके काही प्राणी आहेत, त्या सर्व प्राण्यांत परमात्मा समरूपाने स्थित आहेत. ते परमात्मा कोणात लहान-मोठे, कमी-जास्त नसतात.

पूर्वी याच अध्यायाच्या दुसऱ्या श्लोकात, भगवंतांनी क्षेत्रज्ञाशी आपली एकता सांगत असताना म्हटले होते की, तू संपूर्ण प्राण्यांत क्षेत्रज्ञ मला समज, तोच विषय या ठिकाणी सांगतात की, संपूर्ण प्राण्यांमध्ये परमात्मा समरूपाने स्थित आहेत.

**तिष्ठन्तम्**—संपूर्ण प्राणी उत्पत्ती, स्थिती आणि प्रलय या तीन अवस्थेतून वाटचाल करतात, सर्ग-प्रलय, महासर्ग-महाप्रलय यातून जातात, उच्च-नीच गतीत आणि योनीत जन्माला येतात, अर्थात् सर्व प्राणी कोणत्याही क्षणी स्थिर राहत नाहीत. परंतु परमात्मा त्या सर्व अस्थिर प्राण्यांमध्ये नित्य-निरंतर एकरूपाने स्थित राहतात.

**परमेश्वरम्**—सर्व प्राणी स्वतःला कोणाचा ना कोणाचा ईश्वर अर्थात् मालक मानीतच राहतात. परंतु परमात्मा त्या संपूर्ण प्राण्यांचे, तसेच संपूर्ण जड-चेतन संसाराचे, परम ईश्वर आहेत.

**विनश्यत्स्वविनश्यन्तं यः पश्यति स पश्यति**—प्रतिक्षण विनाशाकडे वाटचाल करणाऱ्या प्राण्यांमध्ये विनाशरहित, सदा एकरूप राहणाऱ्या परमात्म्याला जो निर्विकार पाहतो, तोच वास्तविक योग्य पाहतो. तात्पर्य, परिवर्तनशील शरीराशी संबंध जोडून जो स्वतः आपण आपणाला पाहतो, त्याचे पाहणे योग्य नाही. परंतु सदा जसेच्या तसे राहणाऱ्या परमात्म्याशी संबंध जोडून जो स्वतः आपण आपल्याला अभिन्नरूपाने पाहतो त्याचे पाहणेच योग्य आहे.

पूर्वी याच अध्यायाच्या दुसऱ्या श्लोकात भगवंतांनी म्हटले होते की, क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाचे ज्ञानच माझ्या मताने ज्ञान आहे, तीच गोष्ट या ठिकाणी सांगतात की, जो नष्ट होणाऱ्या प्राण्यांमध्ये परमात्म्याला नाशरहित आणि सम पाहतो, त्याचे असे पाहणेच (ज्ञान) वास्तविक आहे. तात्पर्य, जसे क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाच्या संयोगामध्ये क्षेत्रात तर प्रत्येक क्षणाला परिवर्तन होत असते, परंतु क्षेत्रज्ञ जसाच्या तसाच राहतो, तसेच संपूर्ण प्राणी उत्पन्न आणि नष्ट होतात, परंतु परमात्मा सर्व अवस्थेत समानरूपाने स्थित राहतात.

मागील (सव्वीसाव्या) श्लोकात भगवंतांनी हे सांगितले होते की, जितके काही प्राणी उत्पन्न होतात, ते सर्व क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाच्या संयोगानेच उत्पन्न होतात. परंतु त्या दोन्हीपैकी क्षेत्र तर कोणत्याही क्षणी स्थिर राहत नाही आणि क्षेत्रज्ञ एक क्षणभरही बदलत नाही. म्हणून क्षेत्रज्ञापासून क्षेत्राचा जो निरंतर वियोग होत आहे, त्याचा अनुभव करून घ्यावा. या (सत्तावीसाव्या) श्लोकात भगवान् हे सांगत आहेत की, उत्पन्न आणि नष्ट होणाऱ्या संपूर्ण विषम प्राण्यांमध्ये, जे परमात्मा नाशरहित आणि समानरूपाने स्थित राहतात, त्यांच्याशी आपल्या एकतेचा अनुभव करून घ्यावा.

**परिशिष्ट भाव**—जसे आकाशात कधी सूर्याचा प्रकाश पसरतो, कधी अंधार पडतो, कधी धुई पसरते, कधी शाम वर्णाचे ढग जमा होतात, कधी वीज चमकते, कधी पाऊस पडतो, कधी गाराचा वर्षाव होतो, कधी अनेक प्रकारचे शब्द होतात, गर्जना होते, परंतु आकाशात काही फरक पडत नाही. ते जसेच्या तसे निर्लिप्त, निर्विकार राहते. तसेच सर्वत्र परिपूर्ण असलेल्या सत्तेत कधी महासर्ग आणि महाप्रलय होतो, कधी सर्ग आणि प्रलय होतो, कधी जन्म आणि मृत्यू होतो, कधी दुष्काळ पडतो, कधी महापूर येतो, कधी भूकंप येतो, कधी घमासान युद्ध होते. परंतु सत्तेत कोणताही फरक पडत नाही. केवढीही उलथा-पालथ होवो, परंतु सत्ता जशीच्या तशी निर्लिप्त -निर्विकार राहते. ही निर्विकार, स्वाभाविक आहे, परंतु विकार (संग) कृत्रिम आहे, मानलेला आहे. बद्ध असो वा मुक्त, पापी असो वा धर्मात्मा ही निर्विकार सत्ता दोन्हीत समानरूपाने स्थित आहे.

जसे गंगाजी निरंतर वाहत राहते, जिच्यावरून ती वाहते ती आधारशीला जशीच्या तशी स्थिर राहते. गंगाजीचे जल कधी स्वच्छ, कधी गढूळ असते. कधी जल कमी होते, कधी पूर येतो. कधी तापलेल्या डोंगरावर वर्षांव झाल्याने जल गरम होते, कधी जल थंड असते. कधी वेगाने वाहत असल्यामुळे आवाज करीत वाहते आणि कुठे शांत होते. परंतु आधारशीला जशीच्या तशी राहते, त्यात कधी कोणता फरक पडत नाही. त्याचप्रमाणे कधी धारेत मासे येतात, कधी साप इत्यादी जंतू येतो. कधी लाकडाच्या फळ्या वाहत येतात, कधी निर्माल्य वाहत येते, कधी केर-कचरा येतो, कधी मल आलेला दिसतो, कधी शेण येते, कधी एखादे प्रेत वाहत येते, कधी एखादा जिवंत व्यक्ती पोहत येतो. हे सर्व येऊन जातात, परंतु आधारशीला जशीच्या तशी अचल निर्विकार राहते. तसेच संपूर्ण देश, काळ, वस्तू, व्यक्ती, क्रिया, अवस्था, परिस्थिती, घटना इत्यादी निरंतर वाहत असतात, परंतु स्वयं (चिन्मय सत्ता) जशीच्या तशी अचल राहते. परिवर्तन आणि विनाश, देश, काळ इत्यादीत होतो, स्वयं मध्ये नव्हे.

**'यः पश्यति स पश्यति'**—ही पदे पाचव्या अध्यायाच्या पाचव्या श्लोकात साधनेच्या विषयात आले आहेत आणि प्रस्तुत श्लोकात सिद्धीच्या विषयात आले आहेत. यालाच पुढे अठराव्या अध्यायाच्या सोळाव्या श्लोकात व्यतिरेक पद्धतीने सांगितले गेले आहे की, जो आत्म्याला कर्ता पाहतो, तो दुर्मती योग्य पाहत नाही—**'न स पश्यति दुर्मतिः'**।

***संबंध***—*आता भगवान् नष्ट होणाऱ्या संपूर्ण प्राण्यांमध्ये अविनाशी परमात्म्याला पाहण्याचे फल सांगतात.*

## समं पश्यन्हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम्।
## न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम्॥ २८॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **हि** | = कारण | **समवस्थितम्** | = समरूपाने स्थित असलेल्या | **ईश्वरम्** | = ईश्वराला |
| **सर्वत्र** | = सर्व ठिकाणी | | | **समम्** | = समरूपाने |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **पश्यन्** | = पाहणारा मनुष्य | **आत्मानम्** | = आपली | **परम्** | = परम |
| **आत्मना** | = आपणच-आपल्याकडून | **न, हिनस्ति** | = हिंसा करीत नाही, | **गतिम्** | = गतीला |
| | | **ततः** | = म्हणून (तो) | **याति** | = प्राप्त होतो. |

*व्याख्या*— **समं पश्यन्हि....हिनस्त्यात्मनात्मानम्**— जो मनुष्य स्थावर-जंगम जड-चेतन प्राण्यांमध्ये, उंच-नीच योनीमध्ये, तिन्ही लोकात समान रीतीने परिपूर्ण असलेल्या परमात्म्याला पाहतो अर्थात् त्या परमात्म्याशी आपल्या अभिन्नतेचा अनुभव करतो, तो आपल्याकडून आपली हत्या करीत नाही.

जो शरीराशी तादात्म्य करून शरीराच्या वाढीला आपली वाढ आणि शरीराच्या घटण्याला आपले घटणे, शरीराच्या आजारी होण्याला आपले आजारी होणे आणि शरीराच्या निरोगी होण्याला आपले निरोगी होणे, शरीराच्या जन्मण्याने आपले जन्मणे आणि शरीराच्या मृत्यूने आपला मृत्यू होणे मानतो, तसेच शरीराच्या विकारांना आपले विकार मानतो, तो आपल्याकडूनच आपली हत्या करतो अर्थात् स्वतःला जन्म-मरणाच्या चक्रामध्ये टाकतो. परंतु ज्याची दृष्टी शरीराकडून हटून केवळ सर्वव्यापक, सर्वांचे शासक, परमात्म्याकडे वळते, तो मग आपली हत्या करीत नाही अर्थात् जन्म-मरणाच्या चक्रात जात नाही, आपल्यात संसार आणि शरीराच्या विकारांचा अनुभव करीत नाही

वास्तविक स्वतः आपली (स्वरूपाची) हत्या अर्थात् आपला अभाव कधी कोणी करूच शकत नाही आणि आपला अभाव कधीही होऊच शकत नाही तसेच आपला अभाव करणे कोणी इच्छितही नाही. वास्तविक शरीराशी तादात्म्य करणे हीच आपली हत्या करणे आहे, आपले पतन करणे आहे, आपण-आपणाला जन्म-मरणाच्या चक्रात टाकणे आहे.

**ततो याति परां गतिम्**—शरीराशी तादात्म्य करून जो उच्च-नीच योनीत भटकत होता, वारंवार जन्मत-मरत होता, तो जेव्हा परमात्म्याशी आपल्या अभिन्नतेचा अनुभव करून घेतो, तेव्हा तो परम गतीला अर्थात् नित्यप्राप्त परमात्म्याला प्राप्त होतो.

## मार्मिक गोष्ट

परमात्मतत्त्व सर्व देशात आहे, सर्व काळात आहे, संपूर्ण व्यक्तींमध्ये आहे, संपूर्ण वस्तूंमध्ये आहे, संपूर्ण घटनांमध्ये आहे, संपूर्ण परिस्थितीत आहे, संपूर्ण क्रियामध्ये आहे. ते सर्वात एकरूपाने, समान रीतीने जसेच्या तसे परिपूर्ण आहे. जर अशा स्थितीत ते प्राप्त करणे कठीण आहे, तर मग सुगम काय आहे ? जेव्हा इच्छा कराल, तेव्हा प्राप्त होते. वास्तविक या संसाराचा ''आहे'' पणा दिसतो, तो संसाराचा नव्हे. संसार तर एक क्षणभर स्थिर राहत नाही. यामध्ये केवळ परिवर्तनच परिवर्तन आहे. हा केवळ परिवर्तनाचा पुंजका आहे. ज्यावेळी पंखा वेगाने फिरतो, त्यावेळी एक चक्र दिसत असते, परंतु वास्तविक तेथे चक्र नसते, तर पंख्याचे पातेच चक्ररूपाने दिसत असते. त्याचप्रमाणे हा संसार ''नाही'' असतानाही ''आहे'' रूपाने दिसत असतो. वास्तविक एक परमात्मतत्त्वच ''आहे'' रूपाने विद्यमान आहे.

असा विचार करा की, आता जितके शरीरादी दिसत आहेत, हे शंभर वर्षापूर्वी होते काय? आणि शंभर वर्षानंतर राहतील काय? हे पूर्वीही नव्हते आणि शेवटीही राहणार नाहीत. म्हणून हे मध्यातही नाहीत. परंतु परमात्मा सृष्टी उत्पन्न होण्यापूर्वीही होता, सृष्टि लीन झाल्यावरही राहील. म्हणून परमात्मा सृष्टीच्या वेळीही जसाच्या तसाच परिपूर्ण आहे. जो पूर्वीही नव्हता आणि नंतरही राहणार नाही, तो आत्ताही नाही आणि जो पूर्वीही होता, नंतरही राहील, तो आत्ताही आहे. म्हणून संसाराचा जो ''आहे'' पणा दिसतो, हा भ्रम आहे. परमात्मतत्त्वहेच ''आहे'' रूपाने दिसत असते. त्या परमात्मतत्त्वाच्या सत्तेनेच हा असत् संसार मोहामुळे (मूर्खता) सत्याप्रमाणे दिसतो ''**जासु सत्यता ते जड माया। भास सत्य इव मोह सहाया**'' (मानस १।११७।४)

जर मोह झाला नाही तर हा संसार दिसणार नाही, तर एक परमात्मतत्त्वच दिसेल—''**वासुदेवः सर्वम्**'' (७।१९) कारण परमात्माच होता, परमात्माच राहील, मध्यात दुसरा कोण कोठून येईल? सोन्याचे जितके अलंकार आहेत, त्यात पूर्वी सोनेच होते नंतर सोनेच राहील, म्हणून मध्यात सोन्याशिवाय दुसरे कोठून येणार? अलंकार तर केवळ (रूप, आकृती, उपयोग इत्यादीच्या अनुषंगाने) म्हणण्या-साठी आहेत, तत्त्वतः तर सोनेच आहे. त्याचप्रमाणे संसार केवळ म्हणण्यासाठी आहे, तत्त्वतः तर परमात्माच आहे. त्या परमात्म्याचा अनुभव करण्यातच मनुष्याच्या जन्माची सफलता आहे.

''आहे'' चा (परमात्मा) अनुभव न करता, ''नाही'' त (संसार) गुंतून पडणे मनुष्यता नाही, तर पशुता आहे. या पशुतेचा त्याग करावयाचा आहे—''**पशुबुद्धिमिमां जहि**'' (श्रीमद्भा० १२।५।२) म्हणून भगवान् म्हणतात की, जो नष्ट होणाऱ्या प्राण्यांमध्ये नष्ट न होणाऱ्या परमात्म्याला पाहतो, त्याचे पाहणे योग्य असते. परंतु जो नष्ट होणाऱ्याला पाहतो

आणि नष्ट न होणाऱ्याला पाहत नाही, तो आत्मघाती आहे—

**योऽन्यथा सन्तमात्मानमन्यथा प्रतिपद्यते ।**
**किं तेन न कृतं पापं चौरेणात्मापहारिणा ॥**

(महाभारत, उद्योग० ४२।३७)

जो अन्य प्रकारचा (अविनाशी) असूनही आत्म्याला अन्य प्रकारचा (विनाशी) मानतो, त्या आत्मघाती चोराने कोणते पाप केले नाही?

जो नाशवान् संसाराला न पाहता सर्वत्र समानरूपाने परिपूर्ण असलेल्या परमात्मतत्त्वाला पाहतो, तो आत्मघाती नसतो, अर्थात् तो आपणच आपली हत्या करीत नाही, म्हणून तो परमगतीला प्राप्त होतो. परंतु जो सर्व ठिकाणी परिपूर्ण असलेल्या परमात्मतत्त्वाला न पहाता संसार-शरीर याला पाहतो, तो आत्मघाती, परमगतीला प्राप्त न होता, वारंवार जन्मत-मरत राहतो, दुःख भोगत राहतो. म्हणून मनुष्याने आपणच आपला उद्धार करून घ्यावा, आपले पतन करून घेऊ नये (६।५)

जसे आरशात मुख नसूनही मुख दिसत असते आणि स्वप्नात हत्ती नसतानाही हत्ती दिसत असतो, त्याचप्रमाणे नसूनही संसार दिसत असतो. जर संसाराकडे दृष्टी राहीली नाही तर, संसार "आहे" रूपाने दिसणार नाही. परमात्माच "आहे" रूपाने दिसेल. ही गोष्ट साधकाने दृढतेने मानून घ्यावी, मग तसे कदाचित आता दिसणार नाही, परंतु पुढे तसे दिसू लागेल. जसे, आता साधक वृंदावनात बसला आहे, तर त्याला वृंदावनाचे स्मरण करावे लागणार नाही. झोपताना, भोजन करताना, प्रत्येक कार्य करते वेळी, तो वृंदावनाला स्मरण करीत नाही, परंतु "मी वृंदावनात आहे", या गोष्टीत त्याला संशय नसतो. ते स्मरण केल्याशिवाय स्मरणात राहते. तसेच, समजा, आता जरी परमात्मा दिसले नाही परंतु साधकाने असे दृढतेने मानून घ्यावे की "आहे", रूपाने तर केवळ परमात्माच आहेत, संसार नाही, तर पुढे त्याला तसा अनुभव येऊ लागेल. कारण मिथ्या वस्तू कुठपर्यंत टिकेल आणि सत्य वस्तू कुठपर्यंत लपून राहील ?

**परिशिष्ट भाव**—वास्तविक सत्तावीसाव्या—अठ्ठावीसाव्या श्लोकांत आत्म्याचेच वर्णन आले, परंतु 'परमेश्वर' आणि 'ईश्वर' नाव आल्याने या श्लोकांच्या व्याख्येत परमात्म्याचे वर्णन केले गेले आहे. कारण आत्म्याचे परमात्म्याशी साधर्म्य आहे (याच अध्यायाचा बावीसावा श्लोक).

***संबंध**—याच अध्यायाच्या सव्वीसाव्या श्लोकात भगवंतांनी क्षेत्र-क्षेत्रज्ञाच्या संयोगाचा विषय सांगितला. या संयोगापासून सुटण्याचे दोन उपाय आहेत—परमात्म्याशी असलेल्या आपल्या स्वतःसिद्ध संबंधाला ओळखणे आणि प्रकृतीपासून (शरीर) आपल्या मानलेल्या संबंधाला तोडणे. सत्तावीसाव्या-अठ्ठावीसाव्या श्लोकांत परमात्म्याशी असलेल्या संबंधाला ओळखण्याची गोष्ट सांगितली. आता पुढील दोन श्लोकांत प्रकृतीपासून संबंध तोडण्याची गोष्ट सांगत आहेत.*

## प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः ।
## यः पश्यति तथात्मानमकर्तारं स पश्यति ॥ २९ ॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यः** | = जो | **क्रियमाणानि** | = केल्या जात असल्याचे | **अकर्तारम्** | = अकर्ता |
| **कर्माणि** | = संपूर्ण क्रियांना | **पश्यति** | = पाहतो | **पश्यति** | = पाहतो (अनुभव करतो), |
| **सर्वशः** | = सर्व प्रकारे | **तथा** | = आणि | | |
| **प्रकृत्या, एव** | = प्रकृतिद्वाराच | **आत्मानम्** | = स्वतः आपणाला | **सः, च** | = तोच (यथार्थ पाहतो). |

*व्याख्या*— **प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः**—वास्तविक चेतन तत्त्व स्वतः स्वाभाविक निर्विकार, सम आणि शांतरूपाने स्थित असते. त्या चेतन तत्त्वाची (परमात्मा) शक्ती प्रकृती स्वतः स्वाभाविक क्रियाशील आहे. तिच्यात नित्य-निरंतर क्रिया होत असते—"**प्रकर्षेण करणं ( भावेल्युट ) इति प्रकृतिः**" जरी प्रकृतीला अक्रिय आणि सक्रिय दोन अवस्था असणारी (सर्ग अवस्थेत सक्रिय आणि प्रलय अवस्थेत अक्रिय) म्हणतात, तरीपण सूक्ष्म विचार केला तर, प्रलय अवस्थेतही तिची क्रियाशीलता समाप्त होत नाही. कारण जेव्हा प्रलयाचा आरंभ होतो, तेव्हा प्रकृती सर्ग-अवस्थेकडे चालू लागते. अशा प्रकारे प्रकृतीमध्ये सूक्ष्म क्रिया चालतच राहते. प्रकृतीच्या सूक्ष्म क्रियेलाच अक्रिय अवस्था म्हणतात, कारण या अवस्थेत सृष्टीची रचना होत नाही. परंतु महासर्गात जेव्हा सृष्टिची रचना होत असते, तेव्हा सर्गाच्या आरंभापासून सर्गाच्या मध्यापर्यंत प्रकृती सर्गाकडे चालू लागते आणि सर्गाचा मध्यभाग आल्यावर प्रकृती प्रलयाकडे चालू लागते. अशा प्रकारे प्रकृतीच्या स्थूल क्रियेला सक्रिय अवस्था म्हणतात. जर प्रलय आणि

महाप्रलयात प्रकृतीला अक्रिय मानले जाईल, तर प्रलय, महाप्रलयाचा आदी, मध्य आणि अंत कसा होईल? हे तिन्ही तर प्रकृतीमध्ये सूक्ष्म क्रिया झाल्यानेच होत असतात. म्हणून सर्ग-अवस्थेपेक्षा प्रलय अवस्थेमध्ये अपेक्षाकृत अक्रियता आहे, सर्वथा अक्रियता नसते.

सूर्याचा उदय होतो, मग तो माध्यान्हीला येतो आणि मग तो अस्ताला जातो, तर यावरुन असे वाटते की, सकाळी सर्योदय झाल्यावर माध्यान्हापर्यंत प्रकाश वाढत जातो आणि माध्यान्हापासून सूर्यास्तापर्यंत प्रकाश घटत जातो. सूर्यास्त झाल्यावर अर्ध्या रात्रीपर्यंत अंधार वाढत जातो आणि अर्ध्या रात्रीपासून सूर्योदयापर्यंत अंधार कमी होत जातो. वास्तविक प्रकाश आणि अंधाराची सूक्ष्म संधी मध्यान्ह आणि मध्यरात्रच आहे, परंतु ती सूर्योदय आणि सूर्यास्ताचे वेळी दिसत असते. या दृष्टीने प्रकाश आणि अंधाराची क्रिया समाप्त होत नाही, तर निरंतर होतच राहते. त्याचप्रमाणे सर्ग आणि प्रलय, महासर्ग आणि महाप्रलयामध्येही प्रकृतीत निरंतर क्रिया होतच राहते.*

या क्रियाशील प्रकृतीशी जेव्हा हा पुरुष संबंध जोडून घेतो, तेव्हा शरीरद्वारा होणाऱ्या स्वाभाविक क्रिया (तादात्म्या-मुळे) आपल्यात होत असल्याच्या, प्रतीत होऊ लागतात.

**यः पश्यति तथात्मानमकर्तारं स पश्यति**—प्रकृती आणि तिचे कार्य स्थूल, सूक्ष्म आणि कारण-शरीरात खाणे-पिणे, चालणे-फिरणे, उठणे-बसणे, घटणे-वाढणे, हलणे-डुलणे, झोपणे-जागणे, चिंतन करणे, समाधिस्त होणे इत्यादी ज्या काही क्रिया होतात; त्या सर्व प्रकृतीद्वाराच होत असतात, स्व कडून नव्हे कारण स्व मध्ये कोणती क्रिया होतच नसते—असे जो पाहतो अर्थात् अनुभव करतो, तोच वास्तविक योग्य पाहतो, कारण असे पाहण्याने आपल्यात अकर्तृत्वाचा (अकर्तेपणा) अनुभव येतो.

येथे क्रियांना प्रकृतीकडून होत असल्याचे म्हटले आहे, कुठे गुणांकडून होत असल्याचे म्हटले आहे आणि कुठे इंद्रियांद्वारा होत असल्याचे म्हटले आहे—या तिन्ही गोष्टी एकच आहेत. प्रकृती सर्वांचे कारण आहे, गुण प्रकृतीचे कार्य आहेत आणि गुणांचे कार्य इंद्रिये आहेत. म्हणून प्रकृती, गुण आणि इंद्रिये—यांच्याकडून होणाऱ्या सर्व क्रिया प्रकृतीद्वारा होणाऱ्याच म्हटल्या जातात.

**परिशिष्ट भाव**—जितक्या काही क्रिया होतात, त्या सर्वच्या सर्व प्रकृती विभागातच होतात. यात जीवाचा हात नाही. प्रकृतीद्वारा होणाऱ्या क्रियांनाच गीतेत कुठे 'गुणांपासून होणाऱ्या क्रिया' आणि कुठे 'इंद्रियापासून होणाऱ्या क्रिया' म्हटले गेले आहे. जसे—संपूर्ण कर्म सर्व प्रकारे प्रकृतीच्या गुणांद्वारा केले जातात—'**प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः**' (३। २७), गुणच गुणांत वर्तत आहेत—'**गुणा गुणेषु वर्तन्ते**' (३। २८), गुणांशिवाय दुसरा कोणी कर्ता नाहीच—'**नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टानुपश्यति**' (१४। १९), इंद्रियेच इंद्रियांच्या विषयांत वर्तत आहेत— '**इन्द्रियाणीन्द्रियार्थेषु वर्तन्ते**' (५। ९) इत्यादी. तात्पर्य असे आहे की, संपूर्ण क्रिया प्रकृतिजन्यच असतात. म्हणून प्रकृती कधी किंचिन्मात्रही अक्रिय नसते आणि पुरुषात कधी किंचिन्मात्रही क्रिया होत नाही. म्हणून गीतेत आले आहे की, तत्त्व जाणणारा सांख्ययोगी 'मी (स्वयं) लेशमात्रही काही करीत नाही'—असा अनुभव करतो—'**नैव किञ्चित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित्**' (५। ८), स्वयं करीतही नाही आणि करवितही नाही—'**नैव कुर्वन्न कारयन्**' (५। १३), हा पुरुष शरीरात राहूनही काही करीत नाही किंवा लिप्त होत नाही—'**शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते**' (१३। ३१), जो आत्म्याला कर्ता मानतो, तो दुर्मती योग्य समजत नाही, कारण त्याची बुद्धी शुद्ध नसते—'**तत्रैव सति कर्तारमात्मानं.........**' (१८। १६) इत्यादी.

**यदा भूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति ।**
**तत एव च विस्तारं ब्रह्म सम्पद्यते तदा॥ ३०॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यदा** | = ज्यावेळी (साधक) | | स्थिर असलेले | **विस्तारम्** | = विस्तार (पाहतो), |
| **भूतपृथग्भावम्** | = प्राण्यांच्या वेग-वेगळ्या भावांना | **अनुपश्यति** | = पाहतो | **तदा** | = त्यावेळी (तो) |
| | | **च** | = आणि | **ब्रह्म** | = ब्रह्माला |
| | | **ततः, एव** | = त्या प्रकृतीपासूनच (त्या सर्वांचा) | **सम्पद्यते** | = प्राप्त होतो. |
| **एकस्थम्** | = एका प्रकृतीतच | | | | |

* महासर्गामध्ये काळाच्या गणनेचे साधन सूर्य असतो, परंतु महाप्रलयात सूर्यही लीन होतो. म्हणून महासर्गाच्या काळानेच महाप्रलयाच्या काळाची गणना आरंभ होते. महाप्रलयाच्या काळाच्या गणनेचे एकमात्र साधन नित्य, चेतन, अविनाशी परमात्मतत्त्वच असते.

*व्याख्या*— [प्रकृतीची दोन रूपे आहेत. क्रिया आणि पदार्थ—क्रियेपासून संबंध-विच्छेद करण्यासाठी एकोणतीसावा श्लोक सांगितला. आता पदार्थापासून संबंध-विच्छेद करण्यासाठी हा तीसावा श्लोक सांगत आहेत.]

**यदा भूतपृथग्भावं.........ब्रह्म सम्पद्यते तदा**— ज्यावेळी साधक संपूर्ण प्राण्यांच्या वेगवेगळ्या भावांना, अर्थात् त्रैलोक्यात जितके जरायुज, अण्डज, उद्भिज आणि स्वेदज प्राणी उत्पन्न होतात, त्या प्राण्यांचे स्थूल, सूक्ष्म आणि कारणशरीरांना एका प्रकृतीतच स्थित असलेले पाहतो, त्यावेळी तो ब्रह्माला प्राप्त होतो.

त्रैलोक्यातील स्थावर-जंगम प्राण्यांची शरीरे, नाव, रूप, आकृती, मनोवृत्ती, गुण, विकार, उत्पत्ती, स्थिती, प्रलय इत्यादी सर्व एका प्रकृतीपासूनच उत्पन्न होतात. संपूर्ण प्राण्यांची शरीरे प्रकृतीपासूनच उत्पन्न होतात, प्रकृतीतच स्थित राहतात आणि प्रकृतीमध्येच लीन होतात. अशा प्रकारे पाहणारा ब्रह्माला प्राप्त होतो अर्थात् प्रकृतीपासून पलीकडे असलेले स्वत:सिद्ध आपले स्वरूप परमात्मतत्त्वाला प्राप्त होतो. वास्तविक त्याला पूर्वीपासूनच परमात्मतत्त्व प्राप्त होते, केवळ प्रकृतिजन्य पदार्थांशी त्याने आपला संबंध मानल्यानेच त्याला आपल्या स्वरूपाचा अनुभव येत नव्हता. परंतु जेव्हा तो सर्वांना प्रकृतीतच स्थित असलेले आणि प्रकृतीपासूनच उत्पन्न होत असलेले पाहतो, तेव्हा त्याला आपल्या स्वत:सिद्ध स्वरूपाचा अनुभव होतो.

जसे पृथ्वीपासून उत्पन्न होणारी स्थावर-जंगम जितकी काही शरीरे आहेत तसेच त्या शरीरांमध्ये जे काही परिवर्तन होत असते, रूपांतर होत असते,* क्रिया होत असतात,† त्या सर्व पृथ्वीवरच होत असतात. त्याचप्रमाणे प्रकृतीपासून उत्पन्न होणारे जितके गुण, विकार आहेत, तसेच त्यामध्ये जे काही परिवर्तन होत असते, घट-वाढ होत असते, ती सर्वची सर्व प्रकृतीतच होत असते. तात्पर्य, जसे पृथ्वीपासून उत्पन्न होणारे पदार्थ पृथ्वीतच स्थित राहत असल्याने आणि पृथ्वीतच लीन होत असल्याने पृथ्वीरूपच आहेत. त्याचप्रमाणे प्रकृतीपासून उत्पन्न होणारा सर्व संसार प्रकृतीतच स्थित राहत असल्याने आणि प्रकृतीतच लीन होत असल्याने, प्रकृतिरूपच आहे. अशाच प्रकारे स्थावर-जंगम प्राण्यांच्या रूपात जे चेतन तत्त्व आहे, ते निरंतर परमात्म्यामध्येच स्थित राहत असते. प्रकृतीच्या संगाने त्याच्यात कितीही विकार का दिसेनात, परंतु ते सदा असंगच राहत असते. असा स्पष्ट अनुभव झाल्यास साधक ब्रह्माला प्राप्त होतो.

असा नियम आहे की, प्रकृतीशी आपला संबंध मानल्यामुले स्वार्थबुद्धी, भोगबुद्धी, सुखबुद्धी, इत्यादीने प्राण्यांना वेगवेगळ्या भावाने पाहिल्यास राग-द्वेष उत्पन्न होतात. त्यांच्याविषयी आसक्ती असल्याने त्यांच्यात गुण दिसतात आणि द्वेष असल्याने दोष दिसतात. अशा प्रकारे दृष्टीपुढे राग-द्वेषरूपी पडदा आल्याने वास्तविकतेचा अनुभव येत नाही. परंतु जेव्हा साधक आपले म्हणविले जाणाऱ्या स्थूल, सूक्ष्म, कारणशरीरासहित, संपूर्ण प्राण्यांच्या शरीरांची उत्पत्ती, स्थिती आणि विनाश याला प्रकृतीतच पाहतो, तसेच आपल्यात त्यांचा अभाव पाहतो, तेव्हा त्याच्या दृष्टीपुढून राग-द्वेषाचा पडदा हटतो आणि त्याला स्वत:सिद्ध परमात्मतत्त्वाचा अनुभव होतो.

**परिशिष्ट भाव**—पूर्व श्लोकात व्यक्तीचा विचार आणि प्रस्तुत श्लोकात काळाचा विचार आला आहे.

भक्तीच्या प्रकरणात भगवंताने संपूर्ण भाव आपल्यात सांगितले आहेत—'**भवन्ति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधा:**' (१०।५), परंतु येथे ज्ञानाच्या प्रकरणात संपूर्ण भाव प्रकृतीत सांगितले आहेत. तात्पर्य असे आहे की, जेथे सत्-असत् याचा विभाग केला आहे तेथे सर्वभाव असत् यात सांगितले आहेत आणि जेथे समग्राचा विषय सांगितला आहे, तेथे सर्वभाव आपल्यात सांगितले आहेत. समग्रात सत्-असत् सर्व काही परमात्माच आहेत—'**सदसच्चाहम्**' (९।१९).

***संबंध**—बावीसाव्या श्लोकात ज्याला देहाच्या पलीकडे (पर) असलेले सांगितले आणि मागील (तीसाव्या) श्लोकात ज्याला ब्रह्म प्राप्ती होते असे सांगितले, त्या पुरुषाच्या (चेतन) वास्तविक स्वरूपाचे वर्णन पुढील श्लोकात करतात.*

**अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्मायमव्ययः ।**
**शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते॥ ३१॥**

---

* प्रथम माती आणि बीजाला मापून घ्यावे आणि एका पात्रात ती मापलेली माती टाकून बीज पेरावे आणि पाणी सिंचन करावे. पिकाची वाढ पूर्ण झाल्यावर धान्य तयार करावे आणि मातीला वाळू द्यावे. वाळल्यावर माती व धान्य मोजून पाहिले तर मातीचे वजन कमी आणि धान्याचे वजन जादा होईल. हे मातीचे धान्यात रुपान्तर होणे आहे.

† क्रिया दोन प्रकारच्या असतात—''होणे'' आणि ''करणे''. बालकाचे तरुण होणे आणि म्हातारे होणे इत्यादी क्रिया ''होतात'' आणि खाणे-पिणे इत्यादी क्रिया ''करणे'' केल्या जातात. ह्या सर्व क्रिया शरीरातच होतात.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **कौन्तेय** | = हे कुंतीनंदन! | **निर्गुणत्वात्** | = गुणरहित असल्यामुळे | | | | असूनही |
| **अयम्** | = हा (पुरुष स्वतः) | **अव्ययः** | = अविनाशी | | **करोति** | = काही करीतही | |
| **अनादित्वात्** | = अनादी असल्यामुळे (आणि) | **परमात्मा** | = परमात्मस्वरूपच आहे. | | **न** | = नाही (आणि) | |
| | | **शरीरस्थः अपि** | = हा शरीरात राहत | | **लिप्यते** | = लिप्तही होत | |
| | | | | | **न** | = नाही. | |

*व्याख्या*—**अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्मायमव्ययः**—याच अध्यायाच्या एकोणीसाव्या श्लोकात ज्याला अनादी म्हटले आहे, त्यालाच येथेही "**अनादित्वात्**" पदाने अनादी म्हटले आहे. अर्थात् हा पुरुष आदिरहित (आरंभ) आहे. आता प्रश्न असा होतो की, तेथे तर प्रकृतीलाही अनादी म्हटले आहे, तर मग प्रकृती आणि पुरुष—दोघांत काय फरक झाला? याच्या उत्तरात भगवान् म्हणतात "**निर्गुणत्वात्**" अर्थात् हा पुरुष गुणरहित आहे. प्रकृती अनादी तर आहे, परंतु ती गुणरहित नाही, तर गुण आणि विकार असणारी आहे. तिच्यापासून सात्त्विक, राजस, तामस—हे तीन गुण तसेच विकार उत्पन्न होतात. परंतु पुरुष या तीन गुण आणि विकारांपासून सर्वथा रहित (निर्गुण-निराकार) आहे. असा हा पुरुष साक्षात् अविनाशी परमात्मस्वरूपच आहे, अर्थात् हा पुरुष विनाशरहित परम शुद्ध आत्मा आहे.

**शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते**—हा पुरुष शरीरात राहत असूनही, काहीही करत नाही आणि कोण्या कर्माशी लिप्तही होत नाही. तात्पर्य, या पुरुषाने (स्व) पूर्वी कोणत्याही अवस्थेत काहीही केलेले नाही, वर्तमान काळीही काहीही करीत नाही आणि भविष्यातही काही करू शकत नाही अर्थात् हा पुरुष नेहमीसाठीच प्रकृतीशी निर्लिप्त, असंग आहे, तसेच गुणरहित आणि अविनाशी आहे. याच्यात कर्तृत्व आणि भोक्तृत्व नाहीच.

येथे "**शरीरस्थोऽपि**" म्हणण्याचे तात्पर्य, हा पुरुष ज्यावेळी आपल्याला शरीरात स्थित समजून स्वतःला कार्याचा कर्ता आणि सुख-दुःखाचा भोक्ता मानतो, त्यावेळीही वास्तविक हा तटस्थ, प्रकाशमात्रच राहत असतो. सुख-दुःखाचे भान याच्यापासूनच होत असते—म्हणून याला प्रकाशक म्हणू शकतो, परंतु याच्यात प्रकाशक-धर्म नाही.

येथे "**अपि**" पदाने असे वाटते की, अनादिकाळापासून स्वतःला शरीरात स्थित असलेला मानणारा प्रत्येक (मुंगीपासून ब्रह्मदेवापर्यंत) प्राणी स्वरूपाने नेहमीसाठीच निर्लिप्त, असंग आहे. त्याची शरीराशी कधी एकता झालीच नाही, कारण शरीर तर प्रकृतीचे कार्य असल्यामुळे नेहमी प्रकृतीतच स्थित राहत असते आणि स्व परमात्म्याचा अंश असल्याने नेहमीच परमात्म्यातच स्थित राहत असतो. स्व परमात्म्यापासून कधी वेगळा होऊच शकत नाही. शरीराशी एकात्मता मानली तरीही, शरीराशी कितीही मिसळून गेला तरी, शरीराला आपले स्वरूप मानले तरी त्याची निर्लिप्तता कधी समाप्त होत नाही. तो स्वरूपाने नेहमीसाठी निर्लिप्त राहत असतो. आपल्या निर्लिप्ततेचा अनुभव झाला नाही तरीही, त्याच्या स्वरूपात काहीही विकृती येत नाही. म्हणून त्याने आपल्या स्वरूपाने कधी काहीही केले नाही आणि काही करीतही नाही, तसेच तो स्वतः कधी लिप्त झालाही नाही आणि लिप्त होतही नाही.

जरी पुरुष स्वतःला शरीरात स्थित मानल्यानेच कर्ता आणि भोक्ता बनत असतो, तरीही, एकवीसाव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, "प्रकृती" त स्थित असलेला पुरुषच भोक्ता बनत असतो आणि येथे म्हणतात की, "शरीरात" स्थित झाला तरीही पुरुष कर्ता भोक्ता नाही. असे म्हणण्याचे तात्पर्य, प्रकृती आणि तिचे कार्य—शरीर दोन्ही एकच आहेत. म्हणून पुरुषाला मग प्रकृतीत स्थित म्हणा किंवा शरीरात स्थित म्हणा, एकच गोष्ट आहे. एका शरीराशी संबंध होण्याने संपूर्ण प्रकृतीशी, संपूर्ण शरीराशी संबंध होतो. वास्तविक पुरुषाचा संबंध व्यष्टी शरीराशीही नाही आणि समष्टी प्रकृतीशीही नाही. आपला संबंध शरीराशी मानल्यानेच तो आपल्याला कर्ता-भोक्ता मानतो. वास्तविक तो कर्ताही नाही आणि भोक्ताही नाही.

**परिशिष्ट भाव**—पुरुष अनादी आहे परंतु शरीर आदी असणारे आहे. पुरुष निर्गुण आहे, परंतु शरीर गुणमय आहे. पुरुष परमात्मा आहे, परंतु शरीर अनात्मा आहे. पुरुष अव्यय आहे, परंतु शरीर नाशवान् आहे. म्हणून अज्ञानी मनुष्याद्वारा पुरुषाला (आत्म्याला) शरीरात स्थित असलेले मानल्यावरही वास्तविक तो शरीरात स्थित नसतो अर्थात् शरीराशी तो सर्वथा असंबद्ध असतो—'**न करोति न लिप्यते**'. कारण शरीराचा संबंध तर संसाराशी आहे, परंतु पुरुषाचा संबंध परमात्म्याशी आहे. म्हणून वास्तविक पुरुष कधी शरीरस्थ होऊ शकतच नाही. परंतु या वास्तविकतेकडे लक्ष नसल्या कारणाने मनुष्य त्याला शरीरस्थ असलेल्या मानतो.

'**निर्गुणत्वात्**'—पुरुष स्वतः निर्गुण असूनही गुणांचा संग करून बांधला जातो (गीता—याच अध्यायाचा एकवीसावा

श्लोक). पाहिले तर असेच दिसते की, बंधन स्वतः स्वाभाविक आहे आणि मुक्ती कृतिसाध्य आहे. परंतु वास्तविक मुक्ती स्वतः स्वाभाविक आहे आणि बंधन कृतिसाध्य आहे. गुणांचा संबंध पुरुषाशी नाही, तर प्रकृतीशी आहे. (गीता १३। २३). म्हणून 'अनादी, निर्गुण, परमात्मा, अव्यय' आणि **'न करोति न लिप्यते'**—हे स्वतः स्वाभाविक आहेत. साधकाने या स्वाभाविकतेचा अनुभव करावा.

जसे घरामध्ये राहूनही आपण घराहून वेगळे आहोत, तसेच शरीरात राहत असलेले मानल्यावरही आपण शरीराहून वेगळे आहोत.

**'न करोति न लिप्यते'**—हे साधनजन्य नाही, तर स्वतः स्वाभाविक आहे. तात्पर्य असे आहे की, स्वरूपात लेशमात्रही कर्तृत्व-भोक्तृत्व नाही—ही गोष्ट स्वतःसिद्ध आहे. यात कोणता पुरुषार्थ नाही अर्थात् याच्यासाठी काही करायचे नाही. तात्पर्य, कर्तृत्व-भोक्तृत्व यांना समाप्त करायचे नाही, तर यांना आपल्यात स्वीकार करायचे नाही, यांच्या अभावाचा अनुभव करायचा आहे. कारण हे वास्तविक आपल्यात नाहीतच! म्हणून साधकाने आपल्यात निरंतर अकर्तृत्व आणि अभोक्तृत्व यांचा अनुभव करावा. आपल्यात निरंतर अकर्तृत्व आणि अभोक्तृत्व यांचा (निष्कामता-निर्ममता यांचा) अनुभव होणे हीच जीवन्मुक्ती आहे. यालाच गीतेने स्मृती प्राप्त होणे म्हटले आहे—**'नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा'** (१८। ७३).

जर स्वरूप कर्ता आणि भोक्ता नाही तर मग कर्ता आणि भोक्ता कोण आहे? याचा विचार केला जात आहे. प्रथम हा विचार करावा की, कर्ता कोण आहे? शरीर कर्ता नाही. कारण हे प्रत्येक क्षणाला अभावात जात आहे. मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार—हे चार करण आहेत, ज्यांना 'अंतःकरण' म्हणतात. हे अंतःकरणही कर्ता नाही, कारण करण कर्त्याच्या अधीन असते. परंतु कर्ता स्वतंत्र असतो—**'स्वतन्त्रः कर्ता'** (पाणि० अ० १। ४। ५४). करण तर क्रियेच्या सिद्धीत अत्यंत सहायक असते—**'साधकतमं करणम्'** (पाणि० अ० १।४।४२). म्हणून करणाविना कोणत्या क्रियेची सिद्धी होतच नाही. जसे लेखनी स्वतंत्रतेने लिहित नाही, उलट ते तर लिहिण्याचे एक साधन (करण) आहे, जे लेखकाच्या (कर्त्याच्या) अधीन असते. अंतःकरण कर्ता होत नाही आणि कर्ता करण होत नाही. दुसरी गोष्ट जर करणात कर्तेपणा असेल तरमग सुखी-दुःखी स्वयं का होतो? जर करण सुखी-दुःखी होत असेल तर आपले काय नुकसान आहे? सत्-स्वरूपही कर्ता नाही, कारण मीपणा तर प्रकृतीचे कार्य आहे, ते प्रकृतीहून अतीत असणे कसे संभव आहे? जर स्वरूपात कर्तेपणा असता तर तो कधी मिटला नसता, कारण स्वरूप अविनाशी आहे. म्हणून भगवंताने येथे स्वरूपात कर्तेपणाचा निषेध केला आहे—**'न करोति'**. पुढे अठराव्या अध्यायातही भगवंताने म्हटले आहे की, जो आत्म्याला कर्ता मानतो, तो दुर्मती योग्य रीतीने समजत नाही. कारण त्याची बुद्धी शुद्ध नाही (गीता—अठराव्या अध्यायाचा सोळावा श्लोक). वास्तविक जो भोक्ता (सुखी-दुःखी) होतो, तोच कर्ता असतो.

आता असा विचार करावा की, भोक्ता कोण आहे? भोक्त सत्‌ही नाही आणि असत्‌ही नाही. सत् भोक्ता होऊ शकत नाही, कारण सत् यात कधी अभाव होत नाही—**'नाभावोविद्यते सतः'** परंतु भोक्तेपणाचा अभाव होतो—**'न लिप्यते'**. असत्‌ही भोक्ता होऊ शकत नाही, कारण असत्‌ला सत्ताच नाही—**'नासतो विद्यते भावः'**. असत् यात चेतनाही नसते. म्हणून त्यात भोक्तेपणाची कल्पनाही केली जाऊ शकत नाही. तात्पर्य हे निघाले की, कर्तेपणा आणि भोक्तेपणा सत्‌मध्येही नाही आणि असत्‌मध्येही नाही. सत्-असत्‌च्या संयोगातही कर्तेपणा आणि भोक्तेपणा नाही. कारण जसे दिवस आणि रात्रीचा संयोग असंभव आहे, तसेच सत् आणि असत्‌चा संयोगही असंभव आहे. म्हणून कर्तेपणा आणि भोक्तेपणा केवळ मानलेला आहे—**'कर्ताहमिति मन्यते'** (३। २७). जेव्हा साधक विवेकपूर्वक शरीराशी संपूर्णपणे संबंध-विच्छेद करतो अर्थात् मी-माझेपणा समाप्त करतो (जे वास्तविक नाहीच), तेव्हा कर्ताही राहत नाही किंवा भोक्ताही राहत नाही, तर एक चिन्मय सत्ता राहते. अशाप्रकारे आपल्यात कर्तेपणाचा आणि भोक्तेपणाचा अभावाचा अनुभव झाल्यास साधक मुक्त होतो अर्थात् कर्ता-भोक्ता राहत नाही, तर शुद्ध स्वरूप (चिन्मय सत्ता) राहते.

**'न करोति न लिप्यते'** पदांचे विवेचन भगवंताने पुढे बत्तीसाव्या-तेहतीसाव्या श्लोकात केले आहे.

*संबंध—पूर्व श्लोकात म्हटले गेले आहे की, तो पुरुष काही करतही नाही आणि कुठे लिप्तही होत नाही. तेव्हा असा प्रश्न होतो की, तो कसा लिप्त होत नाही आणि कसा काहीही करत नाही? याचे उत्तर पुढील श्लोकात देतात.*

**यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते।**
**सर्वत्रावस्थितो देहे तथात्मा नोपलिप्यते॥ ३२॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यथा** | = जसे | | असल्यामुळे | **अवस्थितः** | = परिपूर्ण असलेला |
| **सर्वगतम्** | = सर्व ठिकाणी व्याप्त असलेले | **न, उपलिप्यते** | = (कुठे ही) लिप्त होत नाही, | **आत्मा** | = आत्मा |
| **आकाशम्** | = आकाश | **तथा** | = तसेच | **देहे** | = (कोणत्याही) देहात |
| **सौक्ष्म्यात्** | = अत्यंत सूक्ष्म | **सर्वत्र** | = सर्व ठिकाणी | **न, उपलिप्यते** | = लिप्त होत नाही. |

***व्याख्या***— [पूर्व श्लोकात भगवंतांनी "**न करोति**" पदांनी प्रथम कर्तृत्वाचा आणि नंतर "**न लिप्यते**" पदांनी भोक्तृत्वाचा अभाव सांगितला आहे. परंतु या दोन्हींचे विवेचन करताना या श्लोकात, प्रथम भोक्तृत्वाच्या अभावाविषयी म्हटले आहे आणि पुढील श्लोकात कर्तृत्वाच्या अभावाविषयी विवेचन करतील. म्हणून येथे असा व्यतिक्रम ठेवण्यात भगवंताचा कोणता भाव आहे? याचे उत्तर असे आहे की, जरी कर्तृत्वानंतरच भोक्तृत्व येत असते अर्थात् कर्म केल्यानंतरच त्या कर्माच्या फलाचा भोग होत असतो, तरी मनुष्य जे काही कर्म करतो, प्रथम कोणत्या तरी फलाचा (सिद्धी) उद्देश मनात ठेवूनच करत असतो. म्हणून मनात प्रथम भोक्तृत्व येत असते, मग त्यानुसार काम करत असतो अर्थात् नंतर कर्तृत्व येत असते. या दृष्टीने भगवान् येथे सर्वात प्रथम भोक्तृत्वाचा निषेध करतात. भोक्तृत्वाचा (लिप्तता) त्याग झाल्यास कर्तृवाचा त्याग आपोआप होतो अर्थात् फलेच्छेचा त्याग झाल्यास क्रिया केल्यावरही कर्तृत्व येत नाही.]

**यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते**— आकाशाचे कार्य वायू, तेज, जल आणि पृथ्वी आहे. म्हणून आकाश, आपले कार्य वायू इत्यादी चारी भूतांमध्ये व्यापक आहे, परंतु हे चारही आकाशात व्यापक नाहीत, तर व्याप्य आहेत. हे चारही आकाशाच्या अंतर्गत येतात. परंतु आकाश या चारीच्या अंतर्गत येत नाही. याचे कारण हे आहे की, आकाशापेक्षा हे चारही स्थूल आहेत आणि आकाश यांच्यापेक्षा सूक्ष्म आहे. हे चारही सीमित आहेत, सान्त आहेत आणि आकाश असीम आहे, अनन्त आहे. या चारही भूतांमध्ये विकार होतात परंतु आकाशात विकार होत नाहीत.

**सर्वत्रावस्थितो देहे तथात्मा नोपलिप्यते**—जसे आकाश, वायू इत्यादी चारही भूतांत राहत असूनही त्यांच्याशी लिप्त होत नाही, तसेच सर्वत्र, सर्व शरीरांत राहणारा आत्मा कोणत्याही शरीराशी लिप्त होत नाही. आत्मा सर्वात परिपूर्ण राहत असूनही कोणातही मिसळत नाही. तो सदा सर्वदा सर्वथैव निर्लिप्त राहतो, कारण आत्मा स्वतः नित्य, सर्वगत, स्थाणू, अचल, सनातन, अव्यक्त, अचिन्त्य आणि अविकारी आहे (२।२४-२५) तसेच ह्या अविनाशी आत्म्याने हा संपूर्ण संसार व्याप्त आहे (२।१७)

**परिशिष्ट भाव**—चिन्मय सत्ता एकच आहे, परंतु अहंतेमुळे ती वेग वेगळी दिसते. अपरा-प्रकृतीचा अंश '**अहम्**' याला पकडल्यामुळेच हा जीव 'अंश' म्हणविला जातो—'**ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः**' (गीता १५।७). जर हा अहम्ला पकडणार नाही तर एक सत्ताच राहते. सत्तेशिवाय (होणेपणाशिवाय) सर्व कल्पना आहे. ती चिन्मय सत्ता सर्व कल्पनांचा आधार, अधिष्ठान, प्रकाशक आणि आश्रय आहे. त्या सत्तेत एकदेशीयपणा नाही. ती चिन्मय सत्ता सर्वव्यापक आहे. संपूर्ण सृष्टी (क्रियां आणि पदार्थ) त्या सत्तेच्या अंतर्गत आहे. सृष्टी तर उत्पन्न आणि नष्ट होत राहते, परंतु सत्ता जशीच्या तशी राहते. तात्पर्य हे आहे की, चिन्मय सत्ता शरीरस्थही नाही आणि प्रकृतीस्थही नाही, तर आकाशासारखी सर्वत्र स्थित आहे अर्थात् ती संपूर्ण शरीरांत, सृष्टिमात्रात अंतर्बाह्य सर्वत्र परिपूर्ण आहे. ती सर्वव्यापी सत्ता हेच आपले स्वरूप आहे आणि तेच परमात्मतत्त्व आहे. तात्पर्य हे आहे की, सर्वदेशीय सत्ता एकच आहे. तीच योग्यांचा योग आहे, तीच ज्ञान्यांचे ज्ञान आहे आणि तेच भक्तांचे भगवान् आहेत. साधकाचे लक्ष निरंतर त्या सत्तेकडेच रहावे.

सत्तेत एकदेशीयता अहम्मुळेच दिसते. तो अहम् सुख लोलुपतेवर टिकून आहे. साधन करूनही साधक जेथे असतो तेथेच सुख भोगू लागतो—'**सुखसङ्गेन बध्नाति**' (गीता १४।६). ही सुखलेलुपता गुणातीत होईपर्यंत राहते. म्हणून साधकाने या विषयात फारच विशेषतेने सावध रहावे आणि सावधानीपूर्वक सुखलेलुपतेपासून स्वतःला वाचवावे.

***संबंध**—पूर्व श्लोकात भगवंतांनी आत्म्याचे ठिकाणी भोक्तृत्वाचा अभाव सांगितला, आता पुढील श्लोकात त्याचे ठिकाणी कर्तृत्वाचा अभाव सांगत आहेत.*

## यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः।
## क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत॥ ३३॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **भारत** | = हे भरतवंशोद्भव अर्जुन! | **इमम्** | = या | **क्षेत्री** | = क्षेत्रज्ञ (आत्मा) |
| **यथा** | = जसा | **कृत्स्नम्** | = संपूर्ण | **कृत्स्नम्** | = संपूर्ण |
| **एकः** | = एकच | **लोकम्** | = संसाराला | **क्षेत्रम्** | = क्षेत्राला |
| **रविः** | = सूर्य | **प्रकाशयति** | = प्रकाशित करतो, | **प्रकाशयति** | = प्रकाशित करतो. |
| | | **तथा** | = तसेच | | |

*व्याख्या*— **यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः** —डोळ्याने दिसणाऱ्या या संपूर्ण संसाराला, संसारातील संपूर्ण पदार्थांना एक सूर्यच प्रकाशित करत असतो आणि संसाराच्या संपूर्ण क्रिया सूर्य प्रकाशाच्या अंतर्गत होतात, परंतु सूर्याचे ठिकाणी ''मी सर्वांना प्रकाशित करतो'' असे कर्तृत्व नसते. जसे सूर्य प्रकाशातच ब्राह्मण वेद पाठ करतो आणि शिकारी पशूंना मारत असतो, परंतु सूर्याचा प्रकाश वेदपाठ आणि शिकाररूपी क्रियांना करणे-करविण्यास कारण होत नाही.

येथे ''**लोक**'' शब्द संपूर्ण संसाराचा (चौदा भुवने) वाचक आहे. कारण संपूर्ण संसारामध्ये जो काही (चंद्र, तारे, अग्नी, मणी, जडी-बूटी, इत्यादीमध्ये) प्रकाश आहे तो सर्व सूर्याचाच आहे.

**क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत**—सूर्याप्रमाणे एकच क्षेत्री (क्षेत्रज्ञ, आत्मा) संपूर्ण क्षेत्रांना प्रकाशित करत असतो अर्थात् सर्व क्षेत्रांत करणे करविणेरूपी संपूर्ण क्रिया क्षेत्रीच्या प्रकाशातच होतात, परंतु क्षेत्री त्या क्रियांना करणे-करविणे यास कारण बनत नाही.

सूर्य तर केवळ स्थूल संसारालाच प्रकाशित करीत असतो आणि त्याच्या प्रकाशात स्थूल संसाराच्याच क्रिया होतात, परंतु केवळ स्थूल क्षेत्रालाच (संसार) क्षेत्री प्रकाशित करीत नाही, तर तो स्थूल, सूक्ष्म आणि कारण—तिन्ही क्षेत्रांना प्रकाशित करतो, तसेच त्याच्या प्रकाशात स्थूल, सूक्ष्म आणि कारण—तिन्ही शरीरांच्या संपूर्ण क्रिया होतात.

जसे संपूर्ण संसाराला प्रकाशित करत असूनही सूर्याचे ठिकाणी (सर्वांना प्रकाशित करण्याचा) अभिमान निर्माण होत नाही आणि निरनिराळ्या क्रियांना प्रकाशित करूनही सूर्यात नाना भेद होत नाहीत, तसेच संपूर्ण क्षेत्रांना प्रकाशित करणे, त्यांना सत्ता-स्फूर्ती देत असूनही क्षेत्रीच्या ठिकाणी अभिमान, कर्तृत्व, येत नाही आणि निरनिराळ्या क्रियांना प्रकाशित करूनसुद्धा क्षेत्रीत नाना भेद येत नाहीत. तो क्षेत्री नेहमीच जसाच्या तसा निर्लिप्त, असंग राहतो.

कोणतीही क्रिया तसेच वस्तू आश्रयाशिवाय बनत नाही आणि कोणतीही प्रतीती प्रकाशावाचून (ज्ञानाशिवाय) होत नाही. क्षेत्री संपूर्ण क्रिया, वस्तू आणि प्रतीती यांचा आश्रय व प्रकाशक आहे.

**परिशिष्ट भाव**—जसा सूर्य संपूर्ण जगताला (दृश्यमात्राला) प्रकाशित करतो आणि त्याच्या प्रकाशात संपूर्ण शुभाशुभ क्रिया होतात. परंतु सूर्य त्या क्रियांचा कर्ताही बनत नाही किंवा भोक्ताही बनत नाही. तसेच स्वयं संपूर्ण लोकातील सर्व शरीरांना प्रकाशित करतो. अर्थात् त्यांना सत्ता-स्फूर्ती देतो, परंतु वास्तविक स्वयं काहीही करीत नाही किंवा लिप्तही होत नाही, अर्थात् त्याच्यात कर्तृत्वही येत नाही किंवा भोक्तृत्वही येत नाही. तात्पर्य असे आहे की, स्वयंमध्ये प्रकाशकत्वाचा अभिमान नाही.

करण्याची जबाबदारी त्याच्यावरच पडते, जो काही करू शकतो, जसे केवढाही चतुर चित्रकार असो, सामुग्रीविना (रंग ब्रश इत्यादी) तो चित्र बनवू शकत नाही, तसेच पुरुष (चेतन) प्रकृतीच्या साह्याविना काहीही करून शकत नाही. म्हणून पुरुषावर काही करण्याची जबाबदारी असूच शकत नाही. असा सर्वांचा अनुभव आहे की, शरीराविना आपण काही करू शकतच नाही. म्हणून काहीना काही करण्यातच शरीराचा उपयोग आहे. जर आपण काहीही करू इच्छिले नाही तर शरीराचा काय उपयोग आहे? काहीही उपयोग नाही. जर आपण काहीही पाहू इच्छिले नाही तर नेत्र आपल्या काय कामी आले? काहीही ऐकू इच्छिले नाही तर कान आपल्या काय कामी आले? स्थूल क्रिया करण्यात स्थूल शरीर कामी येते. चिंतन, ध्यान करण्यात सूक्ष्मशरीर कामी येते. स्थिरता, समाधीत कारण शरीर कामी येते.* जर काहीही करणार नाही तर तिन्ही शरीरे आपल्या काय कामी आली? शरीर आणि त्याच्याद्वारा होणाऱ्या क्रिया संसाराच्या कामी येतात. आपले स्वरूप चिन्मय सत्तामात्र आहे. म्हणून त्याच्यासाठी शरीर आणि त्याच्या क्रिया काही कामाला येत नाहीत. चिन्मय सत्तामात्रेत कोणती उणीव येत नाही, ते सर्वथा पूर्ण आहे. म्हणून आपल्याला आपल्यासाठी काहीही नको. चिन्मय सत्तेशिवाय दुसरे काही नाहीच. कारण सत्ता एकच होऊ शकते, दोन होऊ शकतच नाही. म्हणून आपल्याला कोण्या जोडीदाराची जरूरी नाही. अशाप्रकारे क्रियेशीही संबंध (कर्तृत्व) नसावा, अप्राप्त

* समाधी आणि व्युत्थान—दोन्ही कारणशरीरात होतात. कारणशरीराशी संबंध-विच्छेद झाल्यास 'सहज समाधी' अथवा 'सहजावस्था' होते.

वस्तूशीही संबंध (कामना) नसावा आणि प्राप्त वस्तूशीही संबंध (ममता) नसावा. म्हणजे प्रकृतीशी तादात्म्य राहणार नाही. प्रकृतीशी तादात्म्य न राहिल्यास प्रकृतीत क्रिया तर होत राहतील, परंतु कर्ता आणि भोक्ता कोणी राहणार नाही. (याच अध्यायाचा एकोणतीसावा श्लोक).

*संबंध—आता भगवान् क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाच्या विभागाला जाणण्याचे फल सांगून प्रकरणाचा उपसंहार करतात.*

## क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमन्तरं ज्ञानचक्षुषा।
## भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यान्ति ते परम्॥ ३४॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **एवम्** | = अशाप्रकारे | **अन्तरम्** | = विभागाला | **विदुः** | = जाणतात, |
| **ये** | = जे | **च** | = तसेच | **ते** | = ते |
| **ज्ञानचक्षुषा** | = ज्ञानरूपी नेत्रांनी | **भूतप्रकृति** | = कार्य-कारणसहित | **परम्** | = परमात्म्याला |
| **क्षेत्रक्षेत्रज्ञयोः** | = क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाच्या | **मोक्षम्** | प्रकृतीहून स्वयंला वेगळे | **यान्ति** | = प्राप्त होतात. |

*व्याख्या—* [ज्ञानमार्ग विवेकापासून आरंभ होतो आणि वास्तविक विवेकातच (बोध) समाप्त होतो. वास्तविक विवेक झाल्यास प्रकृतीशी संपूर्णपणे संबंध-विच्छेद होऊन स्वत:सिद्ध परमात्म्याची प्राप्ती होते—याच विषयाला येथे सांगितले आहे.]

**क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमन्तरं ज्ञानचक्षुषा**—सत्-असत्, नित्य-अनित्य, क्षेत्र-क्षेत्रज्ञाला वेग-वेगळे जाणणे याचे नाव ''ज्ञानचक्षू'' (विवेक) आहे. हे क्षेत्र विकारी आहे, कधीही एकरूप राहत नाही. हे प्रत्येक क्षणाला परिवर्तित होत राहते. असा कोणताही क्षण नाही की, ज्यावेळी हे स्थिर राहत असते. परंतु ह्या क्षेत्रामध्ये राहणारा, ह्याला जाणणारा क्षेत्रज्ञ नेहमी एकरूप राहत असतो. क्षेत्रज्ञात कधी परिवर्तन झाले नाही, होणार नाही आणि होणे शक्यही नाही. अशा प्रकारे जाणणे, अनुभव करणे हेच ज्ञानचक्षूने क्षेत्र-क्षेत्रज्ञाच्या विभागाला जाणणे आहे.

**भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यान्ति ते परम्**—वास्तविक विवेक अर्थात् बोध झाल्यास भूत आणि प्रकृतीशी अर्थात् प्रकृतीच्या सर्व कार्याशी तसेच प्रकृतीशी संबंध-विच्छेद होतो. प्रकृतीशी सर्वथा संबंध-विच्छेद झाल्यास अर्थात् प्रकृतीशी असलेल्या आपल्या वेगळेपणाचा योग्य अनुभव झाल्यास साधक परमात्मतत्त्वाला प्राप्त होतो.

भगवंतांनी पूर्वी अव्यक्ताची उपासना करणाऱ्यांना आपली प्राप्ती सांगितली होती—''**ते प्राप्नुवन्ति मामेव**'' (१२।४), त्याच विषयाला या अध्यायाच्या अठराव्या श्लोकात ''**मद्भावायोपपद्यते**'' पदाने, तेवीसाव्या श्लोकात ''**न स भूयोऽभिजायते**'' पदांनी आणि येथे ''**यान्ति ते परम्**'' पदांनी सांगितले आहे.

ज्ञानमार्गात देहाभिमानच प्रधान बाधा आहे. ही बाधा समाप्त करण्यासाठी भगवंतांनी याच अध्यायाच्या आरंभी ''**इदं शरीरम्**'' पदांनी शरीराहून, (क्षेत्र) आपला (क्षेत्रज्ञ) वेगळेपणाचा अनुभव करण्यासाठी म्हटले आणि दुसऱ्या श्लोकात ''**क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानम्**'' पदाने क्षेत्र-क्षेत्रज्ञाच्या ज्ञानाला वास्तविक ज्ञान म्हटले . पुन्हा क्षेत्र-क्षेत्रज्ञाच्या वेगळेपणाचे कित्येक पद्धतीने वर्णन केले. आता त्याच विषयाचा उपसंहार करत असताना भगवान् शेवटी सांगतात की, क्षेत्र-क्षेत्रज्ञाच्या वेगळेपणाला योग्य रीतीने जाणल्याने क्षेत्राशी सर्वथा संबंध-विच्छेद होतो.

क्षेत्रज्ञानेच परमात्म्याला विमुख होऊन परमात्म्याशी आपली भिन्नता मानली आहे आणि क्षेत्राच्या सम्मुख होऊन क्षेत्राशी एकता मानली आहे. म्हणून परमात्म्याशी एकता आणि क्षेत्राशी संपूर्णपणे भिन्नता—दोन्ही गोष्टींना सांगणे आवश्यक झाले. म्हणून भगवंतांनी याच अध्यायाच्या दुसऱ्या श्लोकात ''**क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि**'' पदांनी क्षेत्रज्ञाची परमात्म्याशी एकता सांगितली आणि येथे क्षेत्राची समष्टी संसाराशी एकता सांगत आहेत. दोन्हींचे तात्पर्य, क्षेत्रज्ञ आणि परमात्म्याची अभिन्नता दाखविण्यातच आहे.

जसे एखाद्या घरामध्ये चहूकडे अंधार आहे. कोणी म्हणतो घरात भूत आहे तर भूत दिसू लागते अर्थात् त्या वेळी भूत असण्याचा भ्रम होतो. परंतु एखाद्या धाडसी पुरुषाने त्या घरात जाऊन प्रकाश केला तर त्यावेळी अंधार आणि भूत दोन्हीही समाप्त होतात. खड्ड्यात कुठे पडू नये किंवा ठोकर लागून पडू नये म्हणून अंधारात चालताना मनुष्य जपून चालतो. त्याचबरोबर विंचू, साप, चोर इत्यादीची भीतीही त्याला वाटत असते. परंतु प्रकाश होताच ही सर्व भीती समाप्त होते. त्याचप्रमाणे सर्वत्र परिपूर्ण असलेल्या प्रकाशस्वरूप परमात्म्याशी विमुख झाल्यास अंध:कारस्वरूपी संसाराची स्वतंत्र सत्ता दिसू लागते आणि अनेक प्रकारची भीती सतावीत राहते. परंतु वास्तविक बोध झाल्यास संसाराची स्वतंत्र सत्ता

राहत नाही आणि सर्व भीती समाप्त होते. एक प्रकाशस्वरूप परमात्माच शिल्लक राहतो. अंधार नाहीसा करण्यासाठी तर प्रकाशाला आणावे लागते, परंतु परमात्म्याला कोठून आणावे लागत नाही. तो तर सर्व देश, काळ, वस्तू, व्यक्ती, परिस्थिती इत्यादीमध्ये जसाच्या तसा परिपूर्ण आहे. म्हणून संसाराशी संपूर्णपणे विच्छेद झाल्यास त्याचा अनुभव आपोआप होतो.

**परिशिष्ट भाव**—क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाच्या विभागाचे ज्ञान '**विवेक**' म्हणविला जातो. जो साधक या विवेकाला महत्त्व देऊन क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाच्या विभागाला योग्य रीतीने जाणतात तसेच प्रकृती आणि त्याचे कार्य याला (शरीराला) स्वयंहून सर्वथा वेगळे अनुभव करतात, ते चिन्मय परमात्मतत्त्वाला प्राप्त होतात. त्यांच्या दृष्टीत एका चिन्मय तत्त्वाशिवाय काहीही राहत नाही.

भगवंताने '**मद्भावायोपपद्यते**' (१३। १८) पदाने सगुणाची प्राप्ती सांगितली आहे आणि येथे '**ये विदुर्यान्ति ते परम्**' पदाने निर्गुणाची प्राप्ती सांगितली आहे. वास्तविक '**मद्भाव**' आणि '**परम्**' ची प्राप्ती एकच आहे (गीता—आठव्या अध्यायाचा एकवीसावा श्लोक आणि चौदाव्या अध्यायाचा सत्तावीसावा श्लोक).

***ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे क्षेत्रक्षेत्रज्ञविभागयोगो नाम त्रयोदशोऽध्यायः॥ १३॥***

**अशा प्रकारे ॐ तत् सत् ह्या भगवन्नामोच्चारणपूर्वक ब्रह्मविद्या व योगशास्त्रमय श्रीमद्भगवद्गीतोपनिषद्रूपी श्रीकृष्णार्जुनसंवादात "क्षेत्रक्षेत्रज्ञविभागयोग" नावाचा तेरावा अध्याय पूर्ण झाला॥ १३॥**

ह्या (तेराव्या) अध्यायामध्ये क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाच्या विभागाचे वर्णन केले गेले आहे. क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ वेगवेगळे आहेत. असा अनुभव आल्यास क्षेत्रज्ञाचा परमात्म्याशी असलेल्या नित्ययोगाचा अनुभव होतो. म्हणून या अध्यायाचे नाव "क्षेत्रक्षेत्रज्ञविभागयोग" ठेवले गेले आहे.

### तेराव्या अध्यायातील पदे, अक्षरे आणि उवाच

(१) या अध्यायामध्ये "**अथ त्रयोदशोऽध्यायः**" ची तीन, "**श्रीभगवानुवाच**" ची दोन, श्लोकांची चारशे आठ आणि पुष्पिकेची तेरा पदे आहेत. अशा प्रकारे संपूर्ण पदांचा योग चारशे सव्वीस आहे.

(२) या अध्यायामध्ये "**अथ त्रयोदशोऽध्यायः**" ची आठ, "**श्रीभगवानुवाच**" ची सात, श्लोकांची एक हजार अठ्ठयाऐंशी आणि पुषिकेची बावन्न अक्षरे आहेत. अशा प्रकारे संपूर्ण अक्षरांचा योग एक हजार एकशे पंचावन्न आहे. या अध्यायाचे सर्वच श्लोक बत्तीस अक्षरांचे आहेत.

(३) या अध्यायात एक उवाच आहे. "**श्रीभगवानुवाच**"

### तेराव्या अध्यायातील प्रयुक्त छन्द

या अध्यायाच्या चौतीस श्लोकांपैकी पहिल्या श्लोकाच्या प्रथम चरणामध्ये तसेच अठराव्या श्लोकाच्या तृतीय चरणात "मगण" प्रयुक्त असल्याने "**म-विपुला**", सतराव्या श्लोकाच्या तृतीय चरणामध्ये तसेच एकतीसाव्या श्लोकाच्या प्रथम चरणात "रगण" प्रयुक्त असल्याने "**र-विपुला**" आणि तेवीसाव्या श्लोकाच्या प्रथम चरणामध्ये "नगण" प्रयुक्त असल्याने "**न-विपुला**" संज्ञा असणारे छन्द आहेत. बाकीचे एकोणतीस श्लोक ठीक "**पथ्यावक्त्र**" अनुष्टुप् छन्दाच्या लक्षणांनी युक्त आहेत.